# अंधारांतील ज्योत

( ABE LINCOLN IN ILLINOIS )

लेखक :

रॉबर्ट इ. शेरवूड

अनुवादक :

नाना अभ्यंकर

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, मुंबई ४.

मूल्य दीड रुपया

# अंधारांतील ज्योत

## दृश्य १ लें

इलिनॉईझमधील न्यू सालेमच्या परिसरांत असलेली ग्रॅहमची लाकडी झोपडी. मध्यरात्रीचा सुमार. एका ओबडधोबड मेजावर कांहीं पुस्तकें व वर्तमानपत्रें पडलेलीं दिसतात. मेजाच्या वर तेलाचा दिवा लोंबत असतो. त्या दिव्याचाच काय तो उजेड कोठडींत असतो.

मेजाच्या एका बाजूला ग्रॅहॅम बसलेला असतो. तो मध्यम वयाचा असून वृत्तीनें शांत व पेशानें शाळामास्तर असतो. मेजाच्या दुसऱ्या बाजूला एब लिंकन हा तरुण बसलेला असतो. तो दिसण्यांत कांहींसा उग्र, थकल्यासारखा पण हातीं घेतलेलें काम पुरें करण्यास तत्पर असा असतो. त्याच्या अंगावरील कपडे जंगलांत वसति केलेल्या अमेरिकनांसारखे आहेत. ग्रॅहॅम मेजावर वांकलेला असून एब खुर्चीवर रेलून बसलेला असल्यामुळें त्याच्या चेहऱ्यावर दिव्याचा उजेड पडलेला नाहीं. ग्रॅहॅम व्याकरणाच्या पुस्तकाचीं पानें चाळतां चाळतां एका पानावर स्थिरावतो.

**ग्रॅहॅम :** The Moods —म्हणजे अर्थ. ( पुस्तक मिटून एबकडे बघत ) प्रत्येक माणसाला कसल्या ना कसल्या लहरी असतात. तुझ्याहि लहरी कांहीं कमी नाहींत एब ! या लहरींमुळें माणसाला स्वभावाच्या निवृत्तीच्या सूक्ष्म छटा ओळखतां येतात. इंग्रजी भाषेचंहि कांहींसं असंच आहे. ही भाषा म्हणजे जणूं कांहीं चालतांबोलता जिवंत मनुष्यप्राणीच आहे असं मानण्याचा तुला प्रयत्न केला पाहिजे. मग तो मनुष्यप्राणीच विक्षिप्त असो किंवा अवखळ असो, भपकेबाज असो नाहींतर बढाईखोर

असो, नाहींतर अगदीं साधा आणि सरळ असो. पण The Moods याचा व्याकरणांत अर्थ काय होतो ? आणि असे अर्थ किती आहेत ?

**एब :** एखादी क्रिया करण्याविषयींचा कर्त्याच्या मनांतला निरनिराळा भाव जेणेंकरून कळतो अशीं जीं क्रियापदाचीं रूपें त्यांस अर्थ म्हणतात. हे अर्थ पांच आहेत. स्वार्थ, आज्ञार्थ, विध्यर्थ, संकेतार्थ व संशयार्थ.

**ग्रॅहम :** ते कशाकशाचे दर्शक आहेत ?

**एब :** स्वार्थ हा अगदीं साधा-सरळ आहे बिचारा. तो फक्त एखादी वस्तुस्थिति सांगण्याचं काम करतो. जसं, ' तो प्रेम करतो,' ' त्याच्यावर प्रेम करतात, किंवा हेंच प्रश्नार्थक करायचं तर, ' तो प्रेम करतो काय ? ' अगर ' त्याच्यावर प्रेम करतात काय ? ' आज्ञार्थ हा हुकूम करतांना योजतात. जसं ' ' चालता हो आणि पुन्हां आपलं थोबाड दाखवूं नकोस--'

**ग्रॅहम :** तुला हेंच उदाहरण बरं सुचलं ? आज्ञार्थाचं याहून चागलं उदाहरण तुला माहीत नाहीं का ?

**एब :** असं उदाहरण बायबलच्या भाषेंतहि देतां येईल. जसें , ' आमची प्रतिदिवसाची भाकर आज आम्हांस दे आणि आमचीं पापं पदरांत घे.

**ग्रॅहम :** बरं , हें पहा-( मेजावरील अडगळींतून एक वर्तमानपत्र काढून ' ) हें वाच बरं. युनायटेड स्टेट्स सिनेटपुढें वेब्स्टरनें केलेलं भाषण आहे हें. भाषण उत्तमपैकीं असून प्रत्येक विधान अगदीं ठासून आहे आणि त्यांत आज्ञार्थाचा पुरेपूर उपयोग करून घेतलेला आहे. आं-आं-आं-हां ! इथून वाच पुढें—

**एब :** ( उजेडांत येऊन ) बॉस्टन येथील ऐतिहासिक चर्चमधल्या घंटां-प्रमाणें निनाद करीत सिनेटर म्हणाले, ' जोंपर्यंत हे संघराज्य एकत्र टिकून आहे तोंपर्यंत आपल्याला आणि आपल्या मुलांबाळांना अनेक सुवर्णसंध्या मिळूं शकतील. त्याच्या पुढच्या भविष्यकाळांत नजर पोंचवण्याचा प्रयत्न मी करीत नाहीं. देव करो आणि माझ्या आयुष्यांत हा भविष्याचा पडदा न उघडो— '

**ग्रॅहम :** वाण्याच्या दुकानांतल्या वस्तूंची यादी वाचल्यासारखं काय वाचतोस ? राष्ट्राच्या भवितव्याचा प्रश्न भेडसावीत असतांना आपण

सिनेटसमोर भाषण करीत आहों अशी कल्पना करून तें भाषण वाच. त्यांत जरा जिवंतपणा आण.

**एव:** ( वाचूं लागतो. ) ' आकाशांतल्या तळपत्या सूर्याकडे अखेरचा दृष्टि-क्षेप करण्याची पाळी माझ्यावर येईल त्या वेळीं, एका काळीं वैभवसंपन्न पण नंतर शकलं उडालेल्या आणि वैभवाला मुकलेल्या संघराज्यावर तो तळपत असलेला पहाण्याचं दुर्भाग्य माझ्या वांट्याला न येवो; विच्छिन्न झालेले- एकमेकांशीं बेबनाव करणारे, युद्धाशिवाय दुसरा धंदा नसणारे प्रांत; एक-मेकांच्या कुरापती काढणारे आणि रक्तानं--भावाभावांनीं परस्परांच्या अंगांतून काढलेल्या रक्तानं न्हाऊन निघणारे प्रांत ! माझे डोळे कायमचे मिटण्याच्या पूर्वीच्या क्षणाला सर्व जगाला ज्ञात असलेल्या आणि सर्व जग सन्मानीत असलेल्या या लोकसत्ताक राज्याचं वैभवशाली मानचिन्हच मला पहायला मिळूं दे ! त्या मानचिन्हांतला एकहि तारा निखळलेला नसावा, त्याचं ब्रीदवाक्य म्हणून—' याला काय किंमत आहे ? '—असलं....

**ग्रॅहॅम :** प्रश्नचिन्हांकित —

**एव :** प्रश्नचिन्हांकित, वाक्य नसावं. तसंच, त्या ब्रीदवाक्यांत ' आधीं स्वातंत्र्य आणि मग संघराज्य ' अशांसारखे फसवणूक करणारे आणि मूर्खपणाचे शब्दहि नसावेत. तर प्रत्येक सच्चा अमेरिकनाच्या अंतः-करणाला नितान्त प्रिय असलेले ' स्वातंत्र्य आणि संघराज्य ' हे शब्द तेजोमय प्रकाशांत सर्वत्र लिहिलेले मला दिसावेत.

**ग्रॅहॅम :** ' स्वातंत्र्य आणि संघराज्य ' यांतील आणि या शब्दावर विशेष आघात देऊन वाच —

**एव ?** (तसें वाचतो) स्वातंत्र्य आणि संघराज्य, आज आणि यावच्चंद्रदिवाकरौ, एक आणि अविभाज्य ! ' ( वर्तमानपत्र मेजावर ठेवून ) हें भाषण ऐकत असतांना श्रोत्यांच्या भावना अनावर होऊन ते उठून उभे राहिले असतील आणि त्यांच्या टाळ्यांच्या कडकडाटानं सारं वातावरण दुमदुमून गेलं असेल.

**ग्रॅहॅम :** कांहीं लोकांनीं टाळ्या दिल्या—कांहींनीं छीःथू केला ! आपापल्या पक्षाच्या धोरणाप्रमाणें त्यांनीं तसं तसं केलं.

**एव :** त्यांच्या या भाषणाचा विषय तरी काय होता ?

**ग्रॅहॅम :** राज्यांना अमेरिकन संघराज्यांतून फुटून बाहेर पडण्याचा हक्क

असावा कीं काय याच्यावर वादविवाद चालला होता. कॅल्हूननें दक्षिण कॅरोलिना प्रांताची बाजू मांडली होती—फार जोरदारपणें मांडली होती. आपल्या भाषणांत तो असं म्हणाला होता कीं, ' प्रत्येक व्यक्तीला जसं स्वातंत्र्य आहे तसंच प्रत्येक राज्यालाहि स्वातंत्र्य आहे-ज्याला जसं वाटेल तसं तो करील. मतदारांच्या मताधिक्यावरून हें संघराज्य एखाद्या राज्याला आवडत नाहीं असें सिद्ध झालें तर तें सोडून फुटून निघण्याचा हक्क त्या राज्याला असलाच पाहिजे; तो आपलं म्हणून स्वतंत्र राष्ट्र किंवा आपलीं म्हणून स्वतंत्र राष्ट्रं निर्माण करूं शकेल; मग त्यामुळें युरोपखंडांत जशीं अनेक राष्ट्रं आहेत तशींच तीं या खंडांतहि होतील, ' पण वेब्स्टरनं त्याला अगदीं सडेतोड उत्तर दिलं. त्यानं असं सिद्ध करून दाखवलं कीं, संघराज्याशिवाय स्वातंत्र्याला कांहीं किंमतच उरत नाहीं. बरं, आज्ञार्थ झाला. आतां संकेतार्थ—

**एब** : संकेतार्थ शक्यता दर्शवितो-बहुधा नको असलेलीच ! जसं—' मी जर कधीं काळीं कर्जातून मुक्त झालोंच तरी बहुधा मी पुन्हां कर्जबाजारी होईनच. '

**ग्रॅहॅम** : ( हंसून ) हेंच उदाहरण बरं सुचलं तुला, एब ?

**एब** : त्याचं असं आहे, रात्रंदिवस हाच एक विचार माझ्या डोक्यांत घोळत असतो. मग दुसरं कोणतं उदाहरण सुचणार मला ?

**ग्रॅहॅम** : तुझ्या स्टोअरमध्यें पुन्हां कांहीं भानगड झाली वाटतं ?

**एब** : । ( शांत मनानें ) हं...स्टोअरमध्यें विक्रीसाठीं आणून ठेवलेली सगळी व्हिस्की बेरीनें पिऊन संपवली ! आतां स्टोअरला केव्हां टाळं लावावं लागेल याचा कांहीं नेम नाहीं. माझ्या वडिलांचा कित्ता अगदीं बरोबर गिरवतो आहे मी. मला कसलंहि अगदीं साधं, सरळ काम द्या— मीं केलाच त्याचा चुथडा !

**ग्रॅहॅम** : एब, निदान इथं तरी तुला अपयश आलेलं नाहीं. इथल्या समाजांतला प्रत्येक मनुष्य तुला चहातो, तुला मदत करण्यासाठीं संधि कधीं मिळते याची जणूं कांहीं प्रत्येकजण वाटच पहात असतो.

**एब** : ( कांहींसें कडवटपणानें ) माहीत आहे मला. तुमचं अंतःकरण तरी किती चांगलं आहे ! मला विद्या यावी म्हणून मध्यरात्रींपर्यंत जागत

बसण्याची शिक्षा तुम्ही आपण होऊन भोगतां. जॉस स्पीड, न्यायमूर्ति ग्रीन वगैरे कितीतरी लोकांचं मी देणं लागतों. मला पोस्टमास्तरची नोकरी मिळवून देण्याची खटपट चालली आहे त्या सगळ्यांची. या गांवांत आठवड्यांतून एकदांच डांक येत असल्यानें मला ती नोकरी सहज जमेल असं वाटतं आहे त्यांना. खरंच, पुष्कळच मित्र आहेत मला—फारच चांगले आहेत बिचारे ! पण माझ्या ललाट्टीची रेषा त्यांना कशी बदलतां येणार ? ललाटीची रेषा म्हणावी कीं माझा स्वभावदोष म्हणावा ?

**ग्रॅहॅम :** तुला या न्यू सालेमच्या बाहेर पडलं पाहिजे. या दरिद्री आणि कुग्रामात कोणाला कधीं संधिच मिळणं शक्य नाहीं.

**एब :** खरं आहे—माझाहि तोच विचार आहे—सारखा तोच विचार चालू असतो माझ्या डोक्यांत. सतत भटकत राहाण्याचा जणू कांहीं शापच मिळालेला आहे आमच्या घराण्याला ! इथून तिथें—तिथून आणखी पलीकडे ! आपल्याला काय पाहिजे आहे तेंच नक्की कळायचं नाहीं आणि तें कांहींहि असलं तरी मिळायचं तर कधींच नाहीं ! माझ्या वडिलांनीं त्यांच्या वृद्धापकाळीं केंटकी तालुक्यांतल्या व्हर्जीनिया शहरांतून जी वारी काढली—व्हर्जीनियांतच जन्म झाला माझा—भरकटत भरकटत ते इंडियानांत गेले आणि तिथून आले या इलिनॉईझ प्रांतांत. अगदीं लहान होतों मी तेव्हां—फारच थोडं आठवतं मला त्यावेळचं. पण गाड्या भरायच्या, सुरू करायच्या, आणि सोडायच्या एवढंच मला आठवतं आहे. ( विषय बदलून ) खरं सांगायचं म्हणजे हें शहर सोडून कान्साज, नेब्रास्का इकडे कुठेंतरी निघून जाण्यासंबंधानेंच सेथ गेलच्या नि माझ्या सारख्या गोष्टी चाललेल्या असतात. बाकी मी कुठेंहि गेलों तरी आमची कथा मात्र मागील पानावरून पुढें चालू राहायची—मित्र भरपूर, कर्जहि भरपूर !

**ग्रॅहॅम :** एब, इतर सर्व क्षेत्रांत अपयशी ठरणाऱ्या लोकांना दोन धंदे केव्हांहि मोकळे असतात. एक शाळामास्तराचा आणि दुसरा राजकारणाचा.

**एब :** मग मला त्यांतल्या त्यांत शाळामास्तरचाच बरा. राजकारणांत पडलें, तर निवडून येण्याचीहि शक्यता असते.

**ग्रॅहॅम :** अगदींच कांहीं अशक्य नाहीं तें—

**एब :** आणि निवडून आलें म्हणजे मोठ्या शहरांत जावंच लागतं—आणि मला तर तें मुळींच नको आहे.

**ग्रॅहॅम :** कां रे बाबा ? शहराची तुला एवढी चीड कां ? कधीं पाहिलं तरी आहेस का तूं शहर ?

**एब :** पाहिलं म्हणजे काय ? मी नदींतून दोनदां न्यू ऑर्लीन्सला गेलेलों आहें. तिथं असतांना माझ्या पोटांत चोवीस तास गोळा उठलेला असे.

**ग्रॅहॅम :** आणि तो कसला ?

**एब :** तुम्ही कदाचित् हंसाल मला—पण मला तिथल्या लोकांची भीति वाटत असे एकसारखी !

**ग्रॅहॅम :** तूं काय म्हणतो आहेस कांहीं कळतच नाहीं मला—

**एब :** ( गंभीरपणें ) मला ते ठार करतील अशी एकसारखी भीति वाटत असे मला.

**ग्रॅहॅम :** ( तितक्याच गंभीरपणें ) ठार करतील अशी ? कशासाठीं ते ठार करणार तुला ?

**एब :** तें मी काय सांगूं ?

**ग्रॅहॅम :** ( जरा थांबून ) मरणासंबंधानं पुष्कळदां विचार चाललेला असतो तुझ्या मनांत नाहीं ?

**एब :** साहजिकच आहे. ज्या भयंकर जंगलांत मी लहानाचा मोठा झालों, त्यांत मृत्यु हा मला नेहमींच निकटचा सहकारी भासत असे. माझी आई निवर्तली तेव्हां लहान होतों मी. तिची शवपेटिका तयार करतांना माझ्या वडिलांना मीं मदत केली—माझ्या चाकूनं मीं खुंट्या कापून दिल्या त्यांना. माझी आजी बेट्सी स्पॅरो हिच्या दफनस्थळाशेजारींच आईचंहि दफन केलं आम्हीं. त्यानंतर त्या स्थानाचं दर्शन घेण्यासाठीं मी पुष्कळदां जात असें—आपल्या इवल्याशा पायांनीं त्याच्यावर बागडणारीं हरणाचीं पिलं कितीदां तरी पाहिलीं आहेत मीं. तेव्हांपासून हरणांची शिकार करण्याचा नुसता विचार माझ्या मनांत आला तरी काळजाचं पाणी होतं माझ्या ! एकदां माझे वडील मला शिकारीला घेऊन गेले होते. एका सावजावर त्यांनीं आपली बंदूक रोखली—ते चाप ओढणार इतक्यांत त्या सावजावर माझी नजर गेली—हरिण होतं तें—त्यांच क्षणीं मी त्यांच्या बंदुकीची नळी खालीं

ओढली–वडिलांचा नेम हुकला–शिकार निसटली–आणि वडिलांनीं चांगलीच हजामत केली माझी ! माणसांच्या-न्यू ऑर्लीन्ससारख्या शहरांतल्या माणसांच्या डोळ्यांकडे पाहिलं कीं मला हरणांचे भेदरलेले डोळे आठवतात आणि त्या माणसांच्या हृदयांत दडून राहिलेली खुनाची भावना मला स्पष्ट दिसूं लागते.

**ग्रॅहॅम :** एका दृष्टीनं मोठा विचित्र माणूस आहेस तूं !

**एब :** तो कसा काय ?

**ग्रॅहॅम :** तुझ्याइतका प्रेमळ आणि त्याचबरोबर माणूसघाण्या मनुष्य पाहूं जातां सांपडणार नाहीं.

**एब :** माणूसघाण्या म्हणजे काय ?

**ग्रॅहॅम :** माणूसघाण्या म्हणजे ज्याला माणसांचा विश्वास वाटत नाहीं आणि म्हणून जो माणसांना नेहमीं चुकवीत असतो तो.

**एब :** तसाहि असेन मी कदाचित्. पण नाहीं–तसा नाहींच मी. मला माणसं आवडतात. एकेका व्यक्तीचा विचार मनांत आला तर कितीतरी माणसं आवडतात- मला ! पण त्याच माणसांची गर्दी झाली, त्यांचा जमाव बनला, सैन्य तयार झालं कीं तीं निराळींच दिसूं लागतात. ( उठून उभा राहात ) काय चक्रम आहे मी ! श्रोता म्हणून इथं आलों आणि वक्त्याचंच काम करूं लागलों.

**ग्रॅहॅम :** मग बिघडलं काय त्यांत ? बोलतांना तूं कुठें चुकलास तर सांगेनच मी ! उदाहरणार्थ, ‘ हजामत केली ’ सारखे अशिष्ट शब्दप्रयोग —

**एब :** ( वरमून ) माहीत आहे तें मला. माझ्या वडिलांच्याविषयीं मी बोलूं लागलों कीं त्यांचीच भाषा तोंडीं येते माझ्या. ( जाऊं लागतो. ) बरं, उद्यां सकाळीं तुम्हांला शाळेला जायचं असेल–तेव्हां जातोंच मी आतां.

**ग्रॅहॅम :** जरा थांब हं–(मेजावरील अडगळींतून एक पुस्तक काढून ) मला तुला एक कविता दाखवावयाची आहे. ( पुस्तक चाळीत ) ही पहा सांपडली. वाचतोस का तेवढी ?

**एब :** ( पुस्तक घेऊन ) On Death–‘ मृत्यूला उद्देशून–’ ? जॉन कीट्स्‌नें आपल्या वयाच्या एकोणिसाव्या वर्षीं लिहिलेली ही कविता ?

“ Can death be sleep, when life is but a dream,
And scenes of bliss pass as a phantom by ?

The transient ( He hesitates on that word). pleasures
as a vision seem,
And yet we think the greatest pain's to die.
( He moves closer to the light. )
How strange it is that man on earth should roam,
And lead a life of woe, but not forsake
His rugged path—nor dare he view alone
His future doom—which is but to awake- "

जीवन हें स्वप्न आहे,
आणि सुखाचे क्षण भासांप्रमाणें
हातांतून निसटणारे आहेत.
मग मृत्यु ही झोंप असेल का ?

हीं क्षणभंगुर (या शब्दांशीं तो जरा अडखळतो) सुखें दिवास्वप्नांसारखीं वाटतात, आणि तरीहि मृत्यूचें दुःख फार मोटें आहे
असें आपण मानतों. (तो दिव्याच्या आणखी जवळ सरकतो

किती आश्चर्याची गोष्ट कीं माणूस
अनंत दुःखें भोगीत या पृथ्वीवर वावरतो
आहे, पण आपला काट्याकुट्यांचा कष्टमय रस्ता
सोडायला तो तयार नाहीं, आपल्या
भवितव्यांतील विनाशाकडे पहाण्याचें
धैर्य त्याला होत नाहीं पण हा
हा विनाश नीट पाहाणं म्हणजेच जागृति नव्हे का ?
( ग्रॅहमकडे पहात राहतो. )

**एब** : मृत्यूकडे निधड्या छातीनें पहाण्यास समर्थ होणं हीच खरी जागृतावस्था. फारच छान कविता आहे ही– (तो ती पुन्हां मनांतल्या मनांत वाचूं लागतो. कमी प्रकाश कमी होत जातो.)

## दृश्य २ रें

न्यू सालेममधील रतलीज पथिकाश्रम. ता. ४ जुलै (स्वातंत्र्यदिन) दुपारची वेळ. उजव्या बाजूला खालीं मेज व दोन खुर्च्या. मेजाच्या

डावीकडे एक स्टूल. डाव्या बाजूला खालीं एक मेज. त्याच्यामागें एक स्टूल. मेजाच्या उजवीकडे दारूचें एक जुनाट पिंप. डावीकडील दरवाजा स्वयंपाकघराकडे जातो. उजव्या बाजूच्या खालीं एक खिडकी. खिडकीखालीं एक बाक. डाव्या बाजूला वर एक शेगडी. तिच्यासमोर एक बाक. डाव्या बाजूला वरच्या कोंपऱ्यांत एक स्टूल. शेगडी व उजवीकडील दरवाजा यांच्यामध्यें आणखी एक बाक. मधल्या बाकावर बेन मॅटलिंग बसलेला असतो. निनिअन एडवर्ड्स व न्यायमूर्ति बाउलिंग ग्रीन प्रवेश करतात. त्यांच्या मागोमाग जॉश स्पीड येतो. जॉशचा जामानिमा व्यवस्थित असून तो शांत, गंभीर, विचारी असा दिसतो. बाउलिंग हे कांहींसे वयस्क, आडव्या बांध्याचे व सुटलेले पण सभ्य असे दिसतात. निनिअन तरुण देखणा आणि सुखवस्तु दिसतो.

**बाउलिंग :** (उजव्या बाजूला वरच्या मेजाजवळ जाऊन) हाच तो रतलीज पथिकाश्रम, बरं का एडवर्ड्स् ! हा म्हणजे अगदीं कांहीं 'परंतु यासम हा—' असा आहे असं नव्हे—पण छान आहे. (जॉश डाव्या बाजूच्या दरवाजाकडे जातो. निनिअन बाउलिंग गेलेल्या टेबलाच्या उजव्या बाजूला जातो.)

**निनिअन :** त्याचं कांहीं वाटायला नको तुम्हांला ! कुठंहि गेलं तरी व्हिस्की ही पातळच असायची—

**जॉश :** (हांक मारतो.) मिस् रतलीज—

**ॲन :** (दारांत उभी राहून) काय मिस्टर स्पीड ?

**जॉश :** एब लिंकन दिसला का तुला कुठें ?

**ॲन :** नाहीं. खालीं कसला तरी खेळ पहात राहिले असतील ते !

**जॉश :** (बाउलिंगकडे वळून) एबला बघून येतों मी—दिसला तर घेऊनच येतों त्याला.

**निनिअन :** तें ठीक आहे जॉश. पण सूर्य मावळायच्या आंत आपल्याला स्प्रिंगफील्डला परत जायचं आहे हें मात्र विसरूं नकोस. (जॉश जातो.)

**बाउलिंग :** (बेनकडे पाहून) कसं काय बेनकाका ! बस ना एडवर्ड्स्— (दोघेहि बसतात)

**बेन** : कसं काय न्यायमूर्ति ?

**ॲन** : ( डाव्या बाजूनें जवळ येऊन ) तुम्हांला काय आणूं न्यायमूर्ति बाउलिंग ?

**बाउलिंग** : ॲन, तुझ्या वडिलांच्या खास सांठ्यांत असलेली उत्तमांतली उत्तम व्हिस्की मिळेल का आम्हांला ?

**ॲन** : मिळेल का म्हणजे काय ? वा ! आत्तां आणतें हं—( डावीकडे जाऊं लागते. )

**बेन** : ( तिला थांबवून ) बार्बाडोस रमची आणखी एक बाटली हवी आहे मला —

**ॲन** : माफ करा मॅटलिंगसाहेब. एक बाटली तर मीं दिलीच तुम्हांला मघाशीं. तेव्हां तुमच्या देखतच बाबांनीं मला नाहीं का सांगितलं कीं, त्या बाटलीचे पैसे आल्याशिवाय—

**बेन** : ठाऊक आहे मला पोरी—तुझा बाप काय म्हणाला तें सगळं मला ठाऊक आहे. पण क्रांतियुद्धांत पराक्रम गाजविलेल्या माणसाची जर एवढीहि पत संभाळली जात नसेल तर ज्यांनीं या राष्ट्राची उभारणी केली त्यांच्याशीं हें राष्ट्र कृतघ्न ठरूं पहात आहे असंच म्हणावं लागेल.

**बाउलिंग** : त्यांना कोणती पाहिजे आहे ती रम आणून दे बरं ॲन. तिचं काय असेल तें बिल मी देईन—( ट्रुम कॉगडाल प्रवेश करतो. )

**ट्रुम** : ॲन, एक सेबॅगो चहा—

**ॲन** : हो— ( डावीकडून निघून जाते. ट्रुम उजवीकडील मेजाच्या डाव्या बाजूला बसतो. )

**बेन** : न्यायमूर्तींचा आभारी आहें मी—

**बाउलिंग** : कांहींतरीच काय बेन ?

**ट्रुम** : अरे वा एडवर्ड्स् ! खरंच काय हो, या आमच्या वैभवशाली आणि उद्योगी राजधानीबद्दल तुमचं काय मत आहे ?

**निनिअन** : एकदम अनुकूल, कॉगडाल. डोंगराच्या माथ्यावरील हें रम्य ठिकाण फारच आवडलं मला. ( ॲन ट्रे घेऊन येते. ) माळजमिनींच्या मध्यावरच आहे, नाहीं का हें ?

**ट्रुम :** खरंच, पश्चिमेकडे जाणाऱ्या मुख्य रस्त्यावर हें शहर आहे. इथला सगळा फाल्तू केरकचरा साफ झाला कीं आपली प्रगति झालीच पाहिजे—हो-हो-अगदीं नक्की झालीच पाहिजे !

**निनिअन :** माझी खात्रीच आहे त्याबद्दल - ( ॲन ट्रेमधील एकेक वस्तु काढून ठेवते. )

**बाउलिंग :** आभार आहेत तुझे, ॲन !

**ॲन :** पोस्टाची गाडी नाहीं आली ना अजून ?

**ट्रुम :** नाहीं ना—तिचीच तर वाट पहातों आहें मी—( ॲन जाऊं लागते. )

**बाउलिंग :** म्हणजे ? तूं कोणाच्या पत्राची वाट पहाते आहेस की काय ॲन ?

**ॲन :** छे हो ! मला कुणाचं कशाला पत्र येणार ?

**बाउलिंग :** तसं समजूं नकोस. या चार जुलैच्या दिवशीं काय होईल नि काय नाहीं हें कांहीं सांगतां येणार नाहीं. ( समोरील भरलेले ग्लास उचलतो. निनिअनहि तसेंच करतो. ) ॲन, खरंच सांगतों तुला. तूं सुखात असावंस असं मनापासून वाटतं मला. ( ती लाजते. ) हं—पण हें बघ—या निनिअन एडवर्ड्स्‌चं लग्न झालेलं आहे—आपल्या नेत्रकटाक्षांनीं त्याला घायाळ करण्याचा प्रयत्न नको करूं.

**ॲन :** काय उगाच थट्टा करतां गरिबाची ? ( जाते. )

**निनिअन :** मोठी गोड आहे छोकरी—

**ट्रुम :** चांगल्या घराण्यांतलीहि आहे ती शिवाय—

**निनिअन :** या बाजूला पुरुषांच्या मानानें बायकांची संख्या पुष्कळच कमी आहे—हिला अजून कोणीं उचललं नाहीं, मोठं आश्चर्य आहे.

**बाउलिंग :** नाहीं कसं बाबा ? मॅकनील नांवाच्या एका तरुणाला बिचारीनं लग्नाचं वचन दिलं आहे. त्याचं खरं नांव आहे मॅकनमार. इथं चार पैसे केले त्यानं आणि लौकरच परत येतों असं हिला सांगून इथून निघून गेला. वाट पहात बसली आहे बिचारी तो केव्हां येतो म्हणून ! ( ती गेलेल्या दिशेनें बघतो. पुन्हां निनिअनकडे पाहून ( बरं पण एडवर्ड्स्, तुम्हांला वेळ आहे अगदीं थोडा. तेव्हां न्यू सालेममध्यें तुमचं काय काम आहे तें जर सांगितलंत तर आम्ही तें करण्यासाठीं शक्य तेवढे प्रयत्न—

**निनिअन** : माझं काय काम आहे तें माहीतच आहे तुम्हां सगळ्यांना—

**ट्रुम** : तुम्हांला मतं हवीं आहेत हें माहीत आहे आम्हांला. माझं मत तरी मी तुम्हांलाच देणार. ( मागील भिंतीवरील जॅक्समच्या चित्राकडे पाहून मूठ वळीत त्वेषानें ) या जुल्मी अँडी जॅक्सनला नामोहरम करण्यासाठीं मी काय वाटेल तें करीन.

**निनिअन** : आपल्या पूज्य अध्यक्षांच्या चारित्र्याबद्दल इतर कोणाच्याहि-इतकाच माझ्याहि मनांत आदर आहे. पण ते जेव्हां आपल्या अर्थ-व्यवस्थेचा नाश करायला उपद्युक्त होतात, आपल्या लोकांचा आपल्या चलनावरील विश्वास उडवून लावायचा प्रयत्न करतात, इतकंच नव्हे तर मोठमोठ्या प्रांतांना संघराज्यांतून फोडून बाहेर काढण्यापर्यंत त्यांची मजल जाते तेव्हां मात्र त्यांना विरोध करण्याशिवाय गत्यंतरच उरत नाहीं.

**बाउलिंग** : जगले वांचले तर अजून दोन वर्षं मुदत आहे त्यांची. त्यांची लोकप्रियता लक्षांत घेतली तर आपण त्यांच्याविरुद्ध फारसं कांहीं करूं शकूं असं वाटत नाहीं.

**निनिअन** : या इलिनॉइझ प्रांताच्या सरकारांतून त्यांच्या बगलबच्चांची हाकालपट्टी करायला तरी आपल्याला सुरुवात करतां येईल कीं नाहीं? आमचं ब्रीदवाक्यहि तयार आहे–' अँड्र्यू जॅकसन मुर्दाबाद !' (निनिअनचं भाषण चालूं असतांना जॅक आर्मस्ट्रॉंग आणि इतर तीन तरुण–बॅब, फिरगस व जॅस्प येतात. एकंदर लक्षणांवरून ते एखाद्या आळींतल्या मवाल्यांच्या 'दादां' सारखे भासतात.)

**जॅक** : ( डावीकडील दाराशीं जाऊन. ) मिस् रतलीज —

**ॲन** : ( दारांत उभी राहून ) काय हवंय् तुला जॅक आर्मस्ट्रॉंग?

**जॅक** : वितवितण्याचं कांहीं कारण नाहीं. थोडीशी दारू हवी आहे आम्हांला–लहानसं पिंप चालेल—

**बॅब** : ( उजव्या बाजूच्या खिडकीजवळ बाकावर बसून ) आणि ती लौकर हवी आहे–घशाला अगदीं कोरड पडली आहे आमच्या—

**ॲन** : चालते व्हा इथून–जातां कीं नाहीं? मवाली कुठचे —

**जॅक** : दारूचं लहानसं पिंप चालेल असं म्हटलं होतं मीं. तुम्हांला सगळ्यांना ऐकूं आलं होतं कीं नाहीं रे?

**फिरगस** : ( बेनच्या उजव्या बाजूला असलेल्या बाकावर बसून ) निदान माझ्या कानांना तरी तसं ऐकूं आलं खरं—

**जॅस्प** : (बाउलिंगच्या मागें उभा राहून) चल–लौकर आण ॲनी--उशीर कशाला उगीच ?

**ॲन** : आत्तां बाबा असते इथं तर लांडग्यांवर झाडतात तशा गोळ्या झाडल्या असत्या त्यांनीं तुमच्यावर—

**जॅक** : तुझा बाप आतां असता इथं तर भीतीनं तुझ्यापेक्षांहि जास्त बोबडी वळली असती त्याची ! आम्हांला तो चांगला ओळखून आहे. पोटांत खाई उठलेले लांडगे परवडले, पण दारूसाठीं आसुसलेले आम्ही त्या लांडग्यांहूनहि भयंकर हें माहीत आहे त्याला ! तुझ्या बापाचं हें दुकान शाबूत राहावं अशी तुझी इच्छा असेल तर आणखी एक क्षणहि फुकट न दवडतां दारू घेऊन ये—( ॲन जाते. )

**ट्रूम** : ( निनिअनला हळूच ) मी मघाशीं म्हणत होतों तो गांवांतला केरकचरा हाच.

**जॅक** : ( ट्रूमजवळ जाऊन ) कां हो शिष्ट ? तुम्ही काय तारे तोडताहांत ?

**बॅब** : हलकट ! राजद्रोही आहे हा. पाठीचं धिरडं केलं पाहिजे साल्याच्या !

**फिरगस** : का साल्याच्या पोटांतला चहा काढूंया बाहेर, जॅक ?

**जॅस्प** : ( बेनला ओलांडून डावीकडे जातो. मोठ्यानें ओरडून ) दारू–दारू–आलीस कीं नाहीं ॲन ?

**जॅक** : आणि हा ढेरपोट्या न्यायमूर्ति बसला आहे इथं ! प्रामाणिक माणसांची तुरुंगांत रवानगी करतो साला ! आणि हा नवा पाहुणा कोण दिसतो आहे ? ऐट तर पहा बेट्याची—

**बाउलिंग** : हे निनिअन एडवर्ड्स्. स्प्रिंगफील्डला असतात हे. आपण आतां मेहेरबानी करून तोंड आवरा आणि खालीं बसा. चुकून तरी एखादे वेळीं सभ्यतेनें वागावं.

**जॅक** : निनिअन एडवर्ड्स् अं ? गव्हर्नरसाहेबांचे चिरंजीव ते हेच वाटतं ? वाहवा रे वाहवा !

**निनिअन** : ( मनमिळाऊपणानं ) अरे वा ! बरोबर ओळखलंत कीं तुम्हीं !

**जॅक** : मग बरोबर आहे तुमच्या अंगावर इतके झकपक कपडे दिसताहेत

ते ! हा सोन्याचा छडा, ही चांदीच्या मुठीची काठी– ( काठी उचलून घेतो. ) चांचे लोकांचा बादशहा शोभेल असल्या बापाच्या पोटीं जन्म मिळण्याचं भाग्य तुम्हांला लाभल्यावर जगांतील उत्तमांतल्या उत्तम वस्तु तुम्हांला मिळणारच मिळणार. बापानं आमच्या पैशांची कराच्या रूपानें लूटमार करायची आणि ते आपल्या छबड्याच्या खिशांत कोंबायचे ! का हो एडवर्डस्, पैसे वाहूं लागले नाहींत ना खिशांतून ?

**बॅब** : आपण त्यांचा भार जरा हलका करूंया ना जॅक—

**फिरगस** : ( जरा पुढें होऊन ) थोडा प्रसाद चाखवायचा का त्याला ?

**जॅक** : ( अजून निनिअनलाच ) बरं, तें राहूं द्या तूर्त. इकडील आपल्या आगमनाचं कारण कळेल का आम्हांला ! मारामारीची तुला हौस आली असेल तर मी जरूर भागवीन ती. ( ॲन येते. ) कुस्ती हवी असेल तर कुस्ती, मारामारी हवी-तर मारामारी, तोंडातोंडी हवी असेल तर तोंडातोंडी-

**ॲन** : ( मध्यभागांतील खुर्चीशीं येऊन ) जॅक आर्मस्ट्रॉंग, दारू ठेवली आहे तिथं. प्या नि ताबडतोब चालूं लागा—

**जॅक** : ही एवढीशी दारू जिभेला तरी लागेल का आमच्या ? यानं पिंप आणायला सांगितलं होतं ना तुला ? ( ॲन चार ग्लासे पुढें ठेवते. बॅब ॲनजवळ येतो. )

**जॅक** : ( ग्लासांकडे पाहून ) हीं चार ग्लास चौघांना ? ही एवढीशी दारू काय नाकांत घालायची आहे ? पिंप घेऊन ये ॲनी. ( बॅब बाकावर– बेनच्या उजव्या बाजूला बसतो. )

**फिरगस** : तिला पेलत नसेल रे तें ! मीच घेऊन येतों हं–( स्वयंपाक-घरांत जातो.

**ॲन** : थांब–थांब– ( त्याच्या पाठोपाठ दारापर्यंत जाते. मग चवताळून मागें पहात ) या मवाल्यापासून सभ्य माणसांचं संरक्षण करायला समर्थ असणारा एकहि मर्द मनुष्य इथं नाहीं का ?

**निनिअन** : आहे–जरूर आहे–मी काय वाटेल तें करीन पण–(उठूं लागतो)

**बाउलिंग** : ( त्याला आंवरीत ) एडवर्ड्स्--त्या मवाल्यांच्या काय नादीं लागतां ?

**जॅक** : ( डाव्या बाजूकडील मेजावर बसून ) बरोबर आहे एडवर्ड्स् या न्यायमूर्तींचं ऐक. कैक पावसाळे पाहिले आहेत त्यांनीं. त्यांच्या पोटाचा घेर वाढलेला दिसत असला तरी डोकं तसं शाबूत आहे त्यांचं अजून. त्यांना माहीत आहे आमचा पराक्रम. तुझ्या काठीची चांदीची मूठ तुझ्या नरड्यांतून बेंबीपर्यंत ढकलूं आम्ही—हें माहीत आहे त्यांना. बॅब, हॅंक स्पिअर्स नि गस हॉशिमर यांची आपण कशी गठडी वळली होती तें सांग ना याला !

**बॅब** : ( उजव्या बाजूकडील मेजाच्या उजवीकडे जाऊन ) त्या दोघांना जॅकनं एका पिंपांत कोंबलं आणि सालेमच्या टेंकाडावरून दिलं तें पिंप खालीं लोटून ! गडगडत, फटके खात, गेलं तें नदींत. आम्ही खालीं उतरून तें पिंप उघडून पाहिलं, तों काय ? पार आंखडून गेल्या होत्या स्वाऱ्या.

**जॅक** : ( बाउलिंगजवळ जाऊन ) अर्थात् तुमची ही जोडी पिंपांत कोंबायची म्हणजे पिंप जरा मोठंच असायला पाहिजे—पण ती व्यवस्था करीन मी. आम्हांला देशद्रोहाच्या विषाचे डोस पाजायला येणाऱ्या या चोरदरवडेखोरांच्या अवलादीचा बंदोबस्त करायचा तर तेवढे कष्ट सहन केलेच पाहिजेत मला. ( फिरगस छोटेंसें पिंप घेऊन येतो. तें शेगडीसमोरील बाकावर ठेवून जवळ उभा राहतो. ) संघराज्याचं विच्छेदन करणारे, आमच्या लोकनायकाची निंदानालस्ती करणारे हरामजादे—

**बेन** : मारो—मारो सालेकू ! पहातां काय ? अस्सल अमेरिकन रक्ताचे असे तुम्हीच उरलां आहांत आतां—

**निनिअन** : ( उठून ) तुम्हांला मारामारी करायची खरोखरच इतकी खुमखुमी असेल तर चला बाहेर—मी तुमच्याशीं दोन हात करायला तयार आहें.

**ट्रुम** : तुमच्या जिवाचा तुम्हांला कंटाळा आला आहे कीं काय एडवर्ड्स् !

**जॅक** : चुकतां आहां तुम्ही. आम्ही कांहीं जीव घेत नाहीं कुणाचा—फक्त हाडं तोडून टाकतों. थोड्याच महिन्यांत पुन्हां सांधूं शकतात तीं. जाऊं दे—तूर्त हा फाल्तू वाद नको ! तें पिंप इकडे आण पाहूं फिरगस. ( एब

अ....२

दारांत आलेला दिसतो. त्याचे कपडे पूर्वीपेक्षां बऱ्यापैकीं आहेत. तो डाक घेऊन आलेला असतो. त्याच्याच मागें जॉश स्पीड उभा आहे. )

**एब :** कसं काय जॅक ?

**जॅक :** ठीक आहे ना एब ?

**एब :** आत्तांच आली डाकगाडी. काय जॅक-कंपनी, तुमचं पिणं सुरूंच आहे वाटतं ? ओहो—ॲन ! पत्र आलं आहे तुला— ( पत्र काढतो. )

**ॲन :** खरंच कीं काय ? ( ती त्याच्याजवळ गेल्यावर एब संकोचल्यासारखा दिसतो. ती त्याच्या हातांतील पत्र घेऊन धांवत धांवत निघून जाते. )

**बेन :** एब, इथं मोठी लढाई जुंपणार आहे आतां—

**निनिअन :** ( जॅकला ) जरूर—लढायचं असेल तर चल बाहेर—

**जॅक :** हो हो—अवश्य—

**एब :** लढाई ! कोणाची नि कशासाठीं ?

**जॅक :** या बेट्या निनिअन एडवर्ड्सला खुमखुमी आली आहे एब. स्प्रिंगफील्डहून आला आहे तो—पाहुण्याचा समाचार घेतलाच पाहिजे मला. ( एब निनिअनकडे न्याहाळून पहातो. )

**बाउलिंग :** एब, ही लढाई तुला थांबवलीच पाहिजे—नाहींतर नक्कीच मुडदा पडणार कुणाचा तरी.

**जॅक :** गप्प बैस ढेरपोट्या ! ॲंडी जॅक्सनचं शत्रुत्व करणाराला मृत्यूची शिक्षा ही सौम्यच म्हणावी लागेल. ( आपल्या दोस्तांकडे पाहून ) चला रे—

**एब :** चला कुठें ? थांबा जरा. जॅक, आजचा दिवस कसला आहे हें विसरलास तूं ?

**जॅक :** मुळींच नाहीं. पण स्वतःला राजकीय पुढारी म्हणविणारांना फटके मारतांना चार जुलै हा दिवसासुद्धां इतर दिवसांसारखाच मानतों मी.

**एब :** (समजुतीच्या स्वरांत) ठीक आहे. पण जॅक, तुला जर लढायचीच हौस असेल तर ती भागविण्यासाठीं घरचे लोक सोडून तूं पाहुण्यांना पकडावंस हें कांहीं बरं नाहीं. मी या शहरचा पोस्टमास्तर असल्यामुळें मलासुद्धां राजकीय पुढारी समजायला हरकत नाहीं. तेव्हां माझ्याशींच दोन हात करून तूं आपली हौस कां नाहीं भागवीत ? ( निनिअनकडे पाहून ) आपली नि माझी कांहीं ओळख नाहीं—माझं नांव लिंकन—पण कुणाहि मर्द

माणसाची ओळख होतांना मला नेहमींच आनंद वाटतो.

**निनिअन :** (एबशीं हस्तांदोलन करीत) आपली ओळख झाली—फार आनंद झाला मला, लिंकन.

**एब :** साहजिकच आहे. तुम्हांला निष्कारण त्रास होणार—होता—कदाचित् दुखापतहि झाली असती. मी अगदीं वेळींच आलों म्हणायचा. आपलीं दोन पत्रं आलीं आहेत बाउलिंगसाहेब. ट्रुम, तुमचं हें 'सिनसिनाटी' मासिक आलं आहे.

**जॅक :** हें पहा एब, ज्यांत तुझा कांहींएक संबंध नाहीं त्या भानगडींत तूं पडूं नयेस हें बरं. यांत देशाभिमानाचा प्रश्न निगडित झाला असून ही आमची सर्वस्वी अगदीं खासगी बाब आहे.

**एब :** या शहरांत घडणाऱ्या प्रत्येक घटनेशीं माझा संबंध आहे, जॅक— आणि खरं तर सध्यां तोच माझा उद्योग आहे; आणि दुसरं असं कीं, हॅना मला आतांच बगीचाजवळ भेटली होती. तिनं तुला वनभोजनाला बोलावलं आहे आणि तेंसुद्धां ताबडतोब. नाहींतर फराळाचे सगळे पदार्थ ती पोरांना वांटून टाकणार आहे आणि मग तुम्हां सर्वांना करावा लागेल थंडा फराळ! तेव्हां तुम्ही ताबडतोब निघालेलं बरं—

**फिरगस :** (जॅकच्या डाव्या बाजूला येऊन जॅकला उद्देशून) एब तुला डावलूं पहातो आहे—त्याचं ऐकणार तूं?

**एब :** हो हो—ऐकणार. (ट्रुमकडे वळून) ट्रुम, तें मासिक तुम्ही आतां वाचणार नसलां तर मला देतां का जरा चाळायला?

**ट्रुम :** हो हो—वा! जरूर—(मासिक त्याच्याकडे भिरकावतो.)

**एब :** आभार आहेत आपले. (जॅककडे वळून) अजून तूं इथंच जॅक? हॅना इंगा दाखवील तेव्हां समजेल. (मासिकावरील वेष्टन फाडतां फाडतां डाव्या बाजूच्या खुर्चीकडे जातो. जॅक त्याच्याकडे क्षणभर पहातो व नंतर हंसूं लागतो.)

**जॅक :** (निनिअनला) ठीक आहे—एबमुळें आज तुम्हांला जीवदान मिळालं आहे. एबला मी माझा मित्र मानतों आणि म्हणून त्याच्या शब्दाचा मान राखणं मला भाग पडतं आहे.

**एब :** आणि शिवाय या सगळ्या मेळाव्यांत मी एकच अशी व्यक्ति आहें कीं, जिच्याशीं दोन हात करण्याची तुझी हिंमत नाहीं—

**जॅक :** पण निनिअन एडवर्ड्स्, मी तुम्हांला आत्तांच असा इशारा देऊन ठेवतों कीं, पुन्हां हें तुमचं थोबाड मला इथं दिसलं—

**एब :** जा ना आतां–तिकडे हॅना वाट पहाते आहे तुझी.

**जॅक :** ठीक आहे एब. जातों मी पण मला तुलासुद्धां एक धोक्याचा इशारा देऊन ठेवणं भाग आहे. वाचनाचं हें वेड काढून टाक तूं आपल्या डोक्यांतून. सकाळीं, दुपारीं, संध्याकाळीं, रात्रीं–केव्हांहि पहा–वाचतो आहे आपला ! आपला हा वज्रासारखा देह मेणासारखा करून घेशील–आणि मग कोणीहि लुंगासुंगा तुला धूळ चारूं शकेल. खुद्द माझ्या हातून तूं पराभव खाल्लास तरीसुद्धां माझं अंतःकरण व्यथित होईल तुझ्या-बद्दल. ( हंसत हंसत एबच्या पाठीवर थाप मारून जाऊं लागतो. ) आपली मुलाखत झाली–फार आनंद झाला मला एडवर्ड्स्–( जातांना त्याच्याकडे खवचटपणें पहातो. बॅब व जॅस्प त्याच्या मागोमाग जातात. फिरगस दारूचें पिंप नेऊं लागतो. )

**निनिअन :** ( जॅक जात असतांना ) मलाहि फार बरं वाटलं–( उजवी-कडील टेबलाशी येऊन बसतो )

**एब :** हें पिंप कुठं मिळालं तुला फिरगस ?

**फिरगस :** ( दाराशीं पोहोंचलेला—असतांना घाबरून ) जॅकनंच मला आणायला सांगितलं होतं तें स्वयंपाकघरांतून–आणि–मी–

**एब :** खालीं ठेव तें. सेथ गेल भेटले तुला तर त्यांचं एक पत्र आलं आहे म्हणून सांग.

**फिरगस :** ( पिंप एका टेबलावर ठेवून ) सांगेन.—( जातो. )

**जॉश :** ( हंसत हंसत निनिअनजवळ येऊन ) मी तुमचं अभिनंदन करतों निनिअन. त्या मवाल्यांनीं तुमच्याशीं मारामारी केल्यानंतर तुम्हांला तुमच्या पत्नीकडे घेऊन जाणं म्हणजे एक दिव्यच ठरलं असतं–( टेबलावरील दारूचे ग्लास उचलून डाव्या बाजूला जातो. )

**निनिअन :** मारामारीचा परिणाम काय झाला असता तें माहीत आहे मला. ( जॉश बाकावर बसतो. एबकडे वळून ) तुमचा–मात्र मी अतिशय आभारी आहें, एब.

**एब** : आभार मानण्यासारखं काय आहे त्यांत ? जॅक आर्मस्ट्रॉंग जिभेचा जरा फटकळ असला तरी त्याचं मन निर्मळ आहे.

**निनिअन** : तुम्ही घेणार ना थोडी आमच्याबरोबर ?

**एब** : छे–छे–माफ करा. ( मासिक वाचूं लागतो. बाउलिंग ग्लासें भरतो.)

**बाउलिंग** : मला आणखी एक हत्ता मारलाच पाहिजे. तुला सांगायला मला कांहीं लाज नाहीं एब–पण माझं सगळं अंग अजून कांपतं आहे— ( एक ग्लास निनिअनच्या हातांत देऊन दुसरा आपण घेतो. )

**जॉश** : आतां तुझं वाचन राहूं दे ना, एब. आम्हांला तुझ्याशीं कांहीं बोलायचं आहे.

**एब** : काय–माझ्याशीं ? आणि तें कशाबद्दल बुवा ? ( जॉश, बाउलिंग आणि निनिअन यांच्याकडे आश्चर्यानें पहातो. )

**जॉश** : मी एडवर्ड्सना तुला भेटण्यासाठीं मुद्दाम घेऊन आलों आहें— आणि त्यांची हरकत नसेल तर कशासाठीं तेंहि सांगतों.

**निनिअन** : माझी कसली हरकत आली आहे जॉश ? सांग ना--( सर्वजण एबकडे आतुरतेनें पहातात. )

**जॉश** : एब, स्टेट असेंब्लीच्या निवडणुकीसाठीं उभं राहायला आहेस का तूं तयार ?

**एब** : ( त्या तिघांकडे पाहून ) केव्हां ?

**जॉश** : आतां–या निवडणुकींत—

**एब** : तो कशाला ?

**निनिअन** : एब, थोड्याच क्षणापूर्वीं आपली ओळख झाली पण आम्हांला या निवडणुकीसाठीं ज्या प्रकारचा मनुष्य पाहिजे आहे तसे तुम्ही आहांत याबद्दल जॉशप्रमाणेंच माझीहि खात्री होऊन चुकली आहे. तुमच्या उमेदवारीला संबंध व्हिग संघटनेचा पाठिंबा मिळेल.

**एब** : जॉश, ही कल्पना तुझ्याच डोक्यांतून निघाली वाटतं ?

**जॉश** : ( हंसून ) नाहीं रे एब–साऱ्या जनतेची मागणी आहे ही.

**ट्रूम** : तुम्हांला ही कल्पना कशी काय वाटते बाउलिंग ?

**बाउलिंग** : ( मनापासून ) अत्युत्कृष्ट कल्पना आहे ही. एब, खरंच सांगतों तुला–संघराज्यांतून फुटून निघण्याची, टेक्सास, नॅशनल बॅंकेवर

ओढवलेला पेंचप्रसंग, गुलामगिरीच्या प्रथेचं उच्चाटन, या सगळ्या विषयांवर तुम्हीं जोरदार व्याख्यानं देत असल्याचं दृश्य मला आत्तांच दिसूं लागलं आहे. खरंच सांगतों, उभ्या आयुष्यांत आली नव्हती इतकी मजा येईल त्या वेळीं.

**एब** : ( उठून—डावीकडे जाऊन ) पण मला याबद्दल काय वाटतं, हें विचारायची तुमच्यापैकीं कोणालाच गरज वाटत नाहीं म्हणायची !

**जॉश** : बरं बुवा, मी विचारतों तुला—कशी काय वाटते तुला ही कल्पना ?

**एब** : ( क्षणभर थांबून ) मोठी विनोदी आहे कल्पना ! माझा निर्णय तडकाफडकीं देतां येणार नाहीं मला. पण चालूं क्षणाला तरी या कल्पनेनं माझ्या मनाची तितकीशी पकड घेतलेली नाहीं एवढं खरं.

**बाउलिंग** : पण जर तूं निवडून आलास तर तुला दररोज तीन डॉलर्स मिळूं लागतील, हें कसं लक्षांत येत नाहीं तुझ्या ?

**एब** : तीन डॉलर्स म्हणजे खूपच झाले यांत तर कांहीं शंकाच नाहीं; आणि बाउलिंग, तुमचा हेतु आला माझ्या लक्षांत. मी तुमचं बरंच मोठं कर्ज लागतों. तेव्हां जर मी बरेच दिवस समजा वीस वर्षे—कायदेमंडळांत राहिलों तर मी रोज तुमचे अडीच डॉलर्स फेडूं शकेन म्हणजे...(बोटें घालून हिशेब करूं लागतो. )

**बाउलिंग** : छे—छे हें भलतंच काय ? माझ्या कर्जाबद्दल विचारसुद्धां शिवलेला नाहीं माझ्या मनाला.

**एब** : तें ठीक आहे बाउलिंग. हा विचार तुमच्या मनाला शिवलासुद्धां नसला तरी माझ्या मनाला मात्र त्याचं विस्मरण होणं शक्य नाहीं. एडवर्ड्स्, तुम्हांलाहि याबद्दल विचार केला पाहिजे. व्हिग पक्ष हा पैसे-वाल्यांचा पक्ष आहे आणि नॅशनल बँकेचं परमेश्वर संरक्षण करो, हेंच त्याचं ब्रीदवाक्य आहे ना ?

**निनिअन** : तेंच एक आहे असं मात्र नाहीं—इतरहि अनेक आहेत.

**एब** : मग ज्या माणसानं पैसे मिळवायच्या बाबतींत आपली नालायकी पुरेपूर सिद्ध केलेली आहे आणि ज्यानं आपल्या डोक्यावर पंधराशें डॉलर्सच्या कर्जाचा डोंगर उभा करून घेतला आहे त्याला तुम्हीं आपला उमेदवार म्हणून उभा केला तर हें कसं काय जमणार ?

**बाउलिंग** : ( निनिअनला ) कर्ज म्हणजे काय हो ? मी सांगतों ती भानडग तुम्हांला. बेरी नांवाच्या एका दुर्दैवी तरुणाच्या भागीदारींत एबनं एक किराणामालाचं दुकान काढलं. त्या दुकानांत विकण्यासाठीं इतर अनेक वस्तूंप्रमाणें त्यांनीं व्हिस्कीहि ठेवली होती. ती विकण्याऐवजीं बेरीनं ती हळूहळू पिऊनच संपविली. ( हंसतो. ) बेरीच्या या उद्योगामुळें दुकानाचं दिवाळं वाजलं आणि दुकानाच्या सबंध कर्जाचा भार एबनें आपण होऊन आपल्या शिरावर घेतला; आणि कर्ज तरी थोडंथोडकं का ? पंधराशें डॉलर्स ! आम्ही सगळेजण एबला इतके कां मानतों हें आतां तुझ्या लक्षांत आलं असेल, एडवर्ड्स् ?

**निनिअन** : तुम्हां सर्व लोकांच्या या भावनेशीं मीहि पूर्णपणें सहमत आहें.

**एब** : आपण करीत असलेल्या या माझ्या गुणगौरवाबद्दल मी आपणां-सर्वांचा फार आभारी आहें. पण या गौरवाचा अतिरेक न करण्याची खबरदारी घ्यायला मात्र विसरूं नका; नाहीं तर रोज तीन डॉलर्स म्हणजे कांहींच नाहीं असं वाटूं लागायचं मला !

**जॉश** : ( एबजवळ जाऊन ) एब, अगदीं हवीच हवी अशी कोणती गोष्ट वाटते तुला ? तुला शिकण्याची अतिशय हौस आहे. तूं निवडून आलास तर तुला उत्तमोत्तम वाचनालयांचा लाभ घेतां येईल, उत्तमोत्तम वकिलांशीं तुझ्या ओळखी होतील——

**एब** : त्याची सबंध यादीच आहे माझ्याजवळ. एका जुन्या पिंपांत सांप-डली ती मला. उत्तमोत्तम वकिलांशीं माझी ओळख झाली तर ती त्यांना आवडेलच हें तरी कशावरून ?

**निनिअन** : त्यांची नको हो तुम्हांला काळजी. आत्तांच त्या मवाल्यांचा नाहीं का तुम्ही निकाल लावलात ? कोणाशीं कसं वागावं याचं मर्म तुम्हांला अचूक माहीत आहे.

**एब** : त्या मवाल्यांना मी वाटेला लावूं शकलों, कारण माझ्यापुढें आपली दादागिरी चालणार नाहीं हें त्यांना पुरेपूर माहीत होतं. पण मतं मिळवणं म्हणजे मतदारांना लोळवणं आहे कीं काय ?–

**बाउलिंग** : ( हंसून ) तें पाहून घेईन मी–( जॉश शेकोटीपुढील बाकावर जाऊन बसतो. )

**एब** : ( जाऊन डावीकडील टेबलावर बसून निनिअनला ) शिवाय माझीं राजकीय मतं तुमच्या मतांशीं जुळतींच आहेत याबद्दल तुम्हांला खात्री नको का करून घ्यायला ! तुम्हांला नको असलेल्या गोष्टींचाच मी पुरस्कार करणार नाहीं कशावरून ?

**निनिअन** : अशीं तुमचीं राजकीय मतं तरी काय आहेत लिंकन ?

**एब** : राजकारणाच्या भानगडीपासून अलिप्त राहावं हें माझं प्रमुख राजकीय मत आहे. तुम्ही नक्की कशासंबंधानं विचारीत आहांत तें लक्षांत नाहीं आलं माझ्या !

**निनिअन** : या जहालमतवाद्यांवर मात करूं शकतील असे नेमस्त हवे आहेत आम्हांला. आत्तांच्या त्या अँड्र्यू जॅक्सनसारख्या स्वतःला जहाल म्हणविणारांनीं आजकाल नुसता धुडगूस मांडला आहे. आपल्या देशाच्या राजकारणाची गाडी योग्य मार्गावर आणली पाहिजे आपल्याला.

**एब** : मी नेमस्त आहें यांत तर शंकाच नाहीं. मीं कायदेमंडळांत प्रवेश मिळविलाच तर देशाला सुधारण्यासाठीं किंवा त्याची प्रगति करण्यासाठीं कसलीहि चळवळ करण्याची उठाठेव मी करणार नाहीं. त्याबद्दल तुम्ही अगदीं निर्धास्त असा. कायदेमंडळांत गेल्यावर तोंड उघडण्याचीसुद्धां मला छाती होणार नाहीं याबद्दल बालंबाल खात्री आहे माझी.

**जॉश** : सांगत नव्हतों मी तुला निनिअन ? तुला पाहिजे तसाच उमेदवार आहे हा. ( दोघेहि हंसतात. निनिअन उठून उभा राहतो. )

**निनिअन** : ( एबजवळ जाऊन ) लिंकन, तुम्ही पोस्टमास्तर असल्यामुळें जनतासंपर्क साधणं तुम्हांला फारच सोपं आहे. आमच्या निवडणुकीच्या मुख्य छावणींतून आम्ही तुम्हांला भाषणं आणि इतर माहितीपत्रकं पाठवीत जाऊं—पत्रांबरोबरच तींहि वांटीत जा म्हणजे झालं. ( अधिक जवळ जाऊन ) म्हणजे त्याचं असं आहे-आमच्या पक्षांत फक्त बडे लोकच तेवढे आहेत हा आरोप आम्हांला खोडून काढायचा आहे आणि त्याच्याचसाठीं बहुजनसमाजांतील माणसांना आपल्या पक्षाचे उमेदवार म्हणून उभे करण्याची धडपड चालली आहे आमची—

**एब** : जरा बऱ्यापैकीं कपडे तरी पाहिजेत कीं नाहीं मला ? उमेदवाराचे कपडे अगदींच गबाळे असणं बरं नाहीं.

**निनिअन** : ( बाउलिंगकडे तिरप्या नजरेनें पहात हंसून ) मला वाटतं, ही अडचण सहज भागवतां येईल—नाहीं का हो न्यायमूर्ति ?

**बाउलिंग** : हो ना ! कांहीं मोठीशी बाब नाहीं.

**निनिअन** : तेव्हां या संधीचा नीट विचार करा, लिंकन. ही जी संधि तुम्हांला आतां मिळणार आहे तिला मर्यादा अशी नाहींच हें लक्षांत असूं द्या. दक्षिणेकडे अफाट अशा टेक्सासपर्यंत, पश्चिमेकडे पॅसिफिक महासागराच्या बाजूला कॅलिफोर्निआच्या साम्राज्यापर्यंत विस्तार पावणाऱ्या या राष्ट्रांत सार्वजनिक अधिकारपदाची एक एक पायरी चढायला प्रारंभ करणं ही किती महत्त्वाची बाब आहे याचा विचार करा. लिंकन, आपला देश म्हणजे आतां केवळ राष्ट्र राहिलं नसून त्याचं आतां खण्ड बनत आहे—आतां आपल्याला जरुरी आहे ती फक्त माणसांची ! ( घड्याळ पहातो. बाउलिंग ट्रुम व जॉश उभे राहतात. बाउलिंग व ट्रुम यांच्याकडे वळून पुन्हा मागें पहात ) ठीक आहे मंडळी. आज रात्रीं स्प्रिंगफील्डला मशालींची मिरवणूक निघणार आहे—तिला हजर राहणं भाग आहे मला. तेव्हां मला आतां निघालंच पाहिजे. बरं आहे लिंकन. आपल्या या भेटीचा फार आनंद झाला मला.

**एब** : ( त्याच्याशीं हस्तांदोलन करीत ) बरं आहे एडवर्ड्स्. आपल्या प्रचारकार्यांत तुम्हांला उत्तम यश मिळो—

**निनिअन** : आणि तुम्हांलाहि—( वळून जलदीनें बाहेर जातो. ट्रुमहि जाऊं लागतो. )

**एब** : ( दाराशीं जाऊन ट्रुमला अडवीत ) असं काय ट्रुम ? सिनसिनाटी हून आलेलं हें मासिक राहिलं ना तुमचं—

**ट्रुम** : तूं वाचतो आहेस ना तें ? संपव कीं वाचून ! मला सध्यां फुरसदच सांपडणार नाहीं त्याच्याकडे बघायला.

**एब** : आभारी आहें मी. माझं वाचून झाल्यावर मी हें घरीं आणून देईन हं तुमच्या—( ट्रुम जातो. )

**बाउलिंग** : पुन्हा आपली भेट होईलच एब. आमचं आतांचं सगळं बिल देऊन टाकायला मी परत येणार आहें म्हणून सांग ॲनला.

**एब :** अवश्य सांगेन—( बाउलिंग जातो. जॉशची नजर एबवर खिळलेली असते. एबच्या हें लक्षांत आल्यावर तो जॉशकडे वळून पहातो—मग त्याच्या-जवळ जाऊन ) मला तुझं मोठं आश्चर्य वाटतं जॉश. मी तुला माझा मित्र समजत होतों—

**जॉश :** मला माहीत आहे तें एब—पण कोपऱ्यांत पडलेल्या या न्यू सालेम शहरांत निवडणुकीसाठीं कोण उभा राहिला तर त्याला मतं मिळण्याची शक्यता आहे, असा प्रश्न मला निनिअन एडवर्ड्सनं विचारतांच साहजिकच तुझं नांव निघालं माझ्या तोंडून. माझ्या या उपद्व्यापामुळें तूं गोंधळून गेला आहेस—नव्हे—तुझ्या डोक्याला या गोष्टीचा तापच झाला आहे याची जाणीव आहे मला. पण तुझी इच्छा असो किंवा नसो—तुला पुढें आलंच पाहिजे; आणि कांहीं तरी विशेष प्रतिष्ठा मिळावायला तुला ही चांगली संधि आली आहे.

**एब :** मोठेपणा मिळविण्याची हांव अनेकांना असते; मीहि त्यांतलाच एक आहें काय ?

**जॉश :** हें तूं मान्य करणार नाहींस एब—पण तुझ्या अंगीं एक विशिष्ट प्रकारचा अहंकार आहे—खरं सांगायचं म्हणजे गर्वच आहे. त्याला योग्य दिशा लागली पाहिजे. तेव्हां तुला माझी ही कल्पना जर पटली तर त्याबद्दल विषाद करण्याची पाळी तुझ्यावर येणार नाहीं किंवा मीं तुझा घात केला असं म्हणण्याची संधि तुला मिळणार नाहीं. ( सेथ गेल प्रवेश करतो. उजवी बाजू व मध्य यांच्या दरम्यान तो उभा रहातो. )

**सेथ :** काय रे एब, फिरगस म्हणत होता—माझं एक पत्र आलं आहे म्हणून ?

**एब :** होय—आलं आहे.

**सेथ :** अरे वा—स्पीड, तुम्हीहि आहांत का इथं ?

**जॉश :** हो ना ! काय, ठीक आहे ?

**एब :** (सेथला त्याचें पत्र देऊन) हें घ्या तुमचं पत्र—(तें घेऊन सेथ डाव्या बाजूला जाऊन बसतो व पत्र वाचूं लागतो. )

**जॉश :** बरं आहे, एब. स्प्रिंगफील्डला माझ्या घरीं मला गेलंच पाहिजे आतां. चारआठ दिवसांत पुन्हां येईन मी—( जातो. )

**एब** : ( जॉश जातांना ) मी असणारच इथं. ( उजवीकडील टेबलाच्या डाव्या बाजूला असलेल्या खुर्चीवर बसतो. )

**बेन** : ( एबजवळ येऊन रागानें ) निवडणुकीसाठीं तूं उभा राहणार आहेस एब ? हे लोक तुला आतां उमेदवार बनवूं पहात आहेत काय ?

**एब** : त्यासंबंधानं मीं अजून विचारच केलेला नाहीं.

**बेन** : तर मग तूं त्याबद्दल विचार न करणंच बरं—माझं ऐक. त्यांच्या जाळ्यांत अडकूं नकोस तूं. त्यांचा नवा पोशाख ही माणसाच्या अधः-पाताची खूण होऊन बसली आहे या अभागी देशांत. तो तूं चढवूं देणार यांना तुझ्या अंगावर ? एब लिंकन, प्रामाणिक मनुष्य आहेस तूं, तुला व्यव-हार कळत नाहीं—तूं कर्जबाजारी झाला आहेस—पण तूं प्रामाणिक आहेस. ज्याला सरकार सरकार म्हणून म्हणतात ती शुद्ध चोरदरवडेखोरांची गुहा आहे. तिथं तुझ्यासारख्या सचोटीच्या माणसाला स्थान नाहीं. त्यांनीं सबंध संघराज्याला लांचखाऊ बनवलं आहे—तुलासुद्धां तसाच करतील ते. पहा—या महापुरुषांकडे पहा—( भिंतीवरील चित्रांकडे अभिमानानें निर्देश करीत ) वॉशिंग्टन, जेफरसन, जॉन ॲडम्स—कुठं आहेत ते आज ? काळाच्या उद-रांत गडप झाले आहेत ते ! त्यांनीं ज्याचा पुरस्कार केला, ज्याच्यासाठीं ते लढले आणि यशस्वीहि झाले-तें सगळं सगळं नष्ट झालं आहे आज ! ( ॲन येऊन डावीकडील टेबल साफसूफ करते व बाजूला जाऊन उभी राहते. ) खरंच, आपण सगळे गुलामगिरीच्या शृंखलांनीं जखडले गेलेले काळे नीग्रो झालों असतों तरी बरं झालं असतं ! त्यांना पोटाला खायला तरी मिळतं—ते वृद्ध झाले किंवा आजारी पडले तर काळजी घेतली जाते त्यांची—( एब ॲनकडे वळून पहातो—तिचें त्याच्याकडे लक्ष नसतें. ) पण तुला काय त्याचं ? आणि लक्ष तरी कुठं आहे तुझं माझ्या बोलण्याकडे ? ( हळूहळू दाराकडे जाऊं लागतो. )

**एब** : ऐकतों आहें ना मी, बेन ?

**बेन** : ( दारांत जाऊन ) कशाला बनवतोस मला ? सगळं लक्षांत आलं आहे माझ्या. तूं त्या कायदेमंडळांत जाणार आणि स्वातंत्र्याच्या मढ्यावर ताव मारणाऱ्या त्या लांडग्यांच्या पंक्तींत जाऊन बसणार. ( बेन निघून जातो. )

**एब** : ( बेन जातां जातां ) त्याची काळजी नको तुला–कायदेमंडळांत नाहीं जात मी–( ॲन उजव्या बाजूला असलेलीं ग्लासें उचलण्यासाठीं पुढें होते. ती संकोचल्यासारखी दिसत असून एब तिच्याकडे कुतूहलानें पहात असतो. ) आपलं बिल देण्यासाठीं आपण परत येत असल्याचा बाउलिंग ग्रीननीं निरोप ठेवला आहे माझ्याजवळ.

**ॲन** : ( तुटकपणानें ) असं कां ? ( बाटल्या व ग्लासें ट्रेमध्यें ठेवून तो ती उचलते. एब चटकन् उठून उभा राहातो. )

**एब** : तुला मी थोडी मदत करूं का ॲन ?

**ॲन** : ( चिडून ) छे-छे-हें काय भलतंच? मला नको आहे कोणाची मदत--

**एब** : माफ कर हं ॲन पण—

**ॲन** : काय ?

**एब** : आपलं काम आटोपून तूं पुन्हां येशील का परत ? मला थोडंसं बोलायचं आहे तुझ्याशीं. ( सेथचें पत्र वाचून संपतें. त्याची मुद्रा विषण्ण दिसते. )

**ॲन** : ठीक आहे. आपली तशीच इच्छा असेल तर बोलेन मी तुमच्याशीं—( जाते. सेथ एबजवळ येतो. )

**सेथ** :एब, मेरीलॅंडमधल्या माझ्या घरच्या मंडळींचं पत्र आलं आहे. नेब्रास्काला जाण्याचं आमचं स्वप्न निदान तूर्त तरी आम्हांला विसरलं पाहिजे असा एकंदर सूर आहे या पत्राचा.

**एब** : का ? काय झालं सेथ ?

**सेथ** : ( निराशेनें ) एक तर आमच्या म्हाताऱ्याला बरं नाहीं–आणि शिवाय फार अशक्तहि झाला आहे तो—

**एब** : अरेरे !

**सेथ** : शेतीचं काम पहायला त्यांनीं परत बोलावलं आहे मला. शेती म्हणजे काय ? छत्तीस एकर तर जमीन–तीसुद्धां वरकसच ! मनांत केवढाले मनोरे बांधले होते मी ! केवढी निराशा झाली माझी ! त्यांतहि मला विशेष वाईट हें वाटतं आहे कीं, तुला दिलेला शब्द पाळणंहि त्यामुळें मला अशक्य झालं आहे.

**एब :** ( स्वयंपाकघराकडे पहात ) त्याचं कांहीं नाहीं सेथ. तें कशाला, मला स्वतःलाच कांहीं दिवस इथून निघतां येईल कीं नाहीं याची शंका आहे. शिवाय, तुझ्या वडिलांना जरा बरं वाटलं कीं, तूं येशीलच परत.
**सेथ :** त्यांना कसचं बरं वाटतय् ? त्यांचं वय काय आहे आतां? त्यांच्या-प्रमाणंच मलाहि तिथंच गाडून घ्यावं लागणार स्वतःला. जन्मभर माझा कोंडमारा होणार आणि एक दिवस त्यांच्याचप्रमाणें मीहि मलेरियाला बळी पडणार ! जाऊं द्या झालं—त्याच्याबद्दल रडत बसून काय उपयोग? पुन्हां पूर्वभागांत परत जाणं भाग आहे हें ठरलं ना ? मग गेलं हें पाहिजेच. जाण्यापूर्वी तुझा निरोप घ्यायला येईन मी, एब.—( उजवीकडून जातो. स्वयंपाकघरांतून ॲन येते. एबची व तिची दृष्टादृष्ट होते. )
**ॲन :** माझ्याशीं काय बोलायचं आहे तुम्हांला, एब ?
**एब :** नाहीं—मला आपलं वाटलं कीं, तुला माझ्याशीं कांहींतरी बोलावंसं वाटत असेल.
**ॲन :** ( चमकून ) कशाबद्दल ?
**एब :** न्यूयॉर्कमधून तुला आलेल्या पत्राबद्दल——
**ॲन :** त्या पत्रासंबंधानं काय माहीत आहे तुम्हांला ?
**एब :** पोस्टमास्तर आहें मी. खरं म्हणजे हें कांहीं बरं नाहीं, पण लोकांच्या कितीतरी खासगी गोष्टी समजतात मला. मॅकनामारचं—नव्हे—मॅकनीलचं अक्षर ओळखलं मी—आणि तें पत्र वाचल्यानंतर जें ऐकायला नको तेंच तुला वाचावं लागलं हेंहि तुझ्या मुद्रेवरून ताडलं मीं. ( ॲन त्याच्याकडे आश्चर्यानें पहाते. त्याच्या निरीक्षणशक्तीचें तिला कौतुक वाटतें. त्याच्या बद्दल तिला कांहींसा आदर वाटूं लागतो. ती बांकावर बसते. )
**ॲन :** पत्रांत कांहींहि मजकूर असला तरी त्याच्याशीं तुमचा कांहींच संबंध नाहीं, एब.
**एब :** मला माहीत आहे तें. पण डोळे पुसण्यापर्यंत तुझी पाळी आली हें लक्षांत आलं माझ्या आणि तुला इतकं दुःख वाटण्याइतकं कांहीं तरी घडलं म्हणून वाईटहि वाटलं मला. त्याचं खरं असं आहे कीं, तुझ्यासंबंधानं पुष्कळदां विचार चालतात माझ्या डोक्यांत—नेहमींच चालतात—मीं इथं आल्यावर तुला पाहिल्यानं पाहिलं—तेव्हांपासूनच चालतात. मीं हा विषय

काढला नसता, पण आपलं दुःख कोणापुढं तरी ओकलं म्हणजे हलकं वाटतं मनाला आणि परमेश्वरसाक्ष मी तुला सांगतों कीं, मी तुझं रहस्य कधींच फोडणार नाहीं. ( त्याच्याकडे पाहून ॲन स्मित करते–त्याला आनंद होतो. याची आपल्याला थोडीफार मदत होणें अशक्य नाहीं अशी तिला आशा वाटूं लागते. )

**ॲन** : तुम्ही खरेखुरे ख्रिस्ती सद्गृहस्थ आहांत, एब्रहाम लिंकन.

**एब** : छे–छे सद्गृहस्थ नाहीं मी. मी आपला एक साधासुधा—भणंग मनुष्य आहें—

**ॲन** : ( हंसून ) बरं, बरं–बसा तर खरे, इथं माझ्याजवळ बसा ना–( एब तिच्या शेजारीं जाऊन बसतो. ) ऐकणाराला हसूं यावं असं बोलण्याची हातोटी बाकी तुम्हांला छान साधली आहे.

**एब** : अग, त्यासाठीं मला बोलावं तरी कुठें लागतं आहे ? माझ्याकडे नुसतं पाहिलं तरी पुरतं—

**ॲन** : तुम्ही त्या पत्राबद्दल म्हणालांत तें खरं आहे. कितीतरी महिन्यांत त्याचं पत्र आलं नव्हतं मला–आणि आत्तां आलं त्यांत त्यानं लिहिलं आहे कीं, त्याच्या कौटुंबिक अडचणींमुळे न्यू सालेमला परत केव्हां येतां येईल हें कांहीं सांगवत नाहीं त्याला. म्हणजे कधींच येतां येणार नाहीं अशीहि भीति नाहीं का ?

**एब** : असं कसं ॲन ?

**ॲन** : नाहीं तर काय ? ( त्याच्याकडे पाहून ) मॅकनीलला मीं विवाहाचं वचन दिलं म्हणून तूं मला वेडी म्हणत असशील, नाहीं ?

**एब** : मुळींच नाहीं. मलाहि तो आवडायचा–अजूनहि आवडतो. त्यानं आपलं नांव बदललं तेंसुद्धां कसल्या तरी लफड्यांतून स्वतःची सुटका करून घेण्यासाठीं–असं मला मुळींच वाटत नाहीं. मोठा चलाख आहे तो–दिसतो तरी किती सुरेख ? त्याच्यावर प्रेम करणाऱ्या कोणाहि तरुणीला मी दोष देणार नाहीं.

**ॲन** : मला वाटत नाहीं एब माझं त्याच्यावर प्रेम आहेसं. जो इतका बेइमान आहे त्याच्यावर मी प्रेम करूं शकेनसं वाटत नाहीं मला.

**एब :** ( त्रयस्थ दिसण्याचा प्रयत्न करीत ) मग तर मनाला लावून घेण्याचं कांहींच कारण नाहीं. आतां बिचाऱ्या सेथ गेलची परिस्थिति पहा—त्याला खरोखरच अतिशय वाईट बातमी समजली आहे. त्याचे वडील आजारी आहेत आणि पश्चिम विभागांत जाऊन तिकडे स्थायिक होण्याचं त्याचं सुखस्वप्न हवेंत विरून गेलं आहे.

**ॲन :** ( त्याच्याकडे पाहून ) स्त्रियांच्या अंतःकरणाची तुम्हांला तितकीशी पारख दिसत नाहीं, एब.

**एब :** शक्य आहे—पण स्त्रियांसंबंधींचे विचार पुष्कळदां चालूं असतात माझ्या डोक्यांत.

**ॲन :** त्याचं कारण आहे एब. तुम्ही चांगले दणकट आहांत, कोणालाहि लोळविण्याची ताकद आहे तुमच्या मनगटांत—म्हणून दुबळ्यांच्या भावना समजत नाहींत तुम्हांला. पण मी स्त्री आहें—सबंध शहरभर मी चर्चेचा विषय होऊन राहाणार, लोक माझ्याबद्दल त्यांच्या जिभेला येईल तें बोलणार—दिसतं आहे मला हें सारें ! त्यानं मला टाकली—मी परित्यक्ता आहे असंच ते म्हणणार ! माझ्या तोंडापुरतं ते माझ्याबद्दलच्या सहानुभूतीचं नाटक करून दाखवितील, पण माझी पाठ त्यांच्याकडे वळतांच ते नक्की नाकं मुरडणार !

**एब :** बरंचसं खरं आहे तुझं म्हणणं ! पण या लोकांना अशी सवलत देणार तूं ?

**ॲन :** सांगितलं नाहीं का तुम्हांला ? हा माझा दुबळेपणा आहे—अहंकार आहे. तुम्हांला हें कसं समजावं एब ? ( बोलतां बोलतां ती खिडकीशीं जाऊन बाहेर पहाते उभी राहते. खुर्चीवर बसल्या बसल्या एब तिच्याकडे पहात असतो. )

**एब :** तुला वाटतं तितकं अशक्य नाहीं तें ॲन. मला स्वतःलाहि एक प्रकारचा अहंकार आहे. जॉश स्पीडनं आत्तांच बोलून दाखविलं तसं—आणि खरंहि आहे तें—माझं तुझ्यावर—माझं तुझ्यावर प्रेम आहे हें मी हा वेळपर्यंत तुझ्यापासून लपवून ठेवलं त्याच्या मुळाशीं माझा अहंकार नव्हता तर दुसरं काय होतं ? ( ती आश्चर्यानें त्याच्याकडे वळून पहाते. ) मलाहि

कोणी माझा उपहास केलेला खपत नाहीं. माझी लायकी मी ओळखून आहें, रूपानं मी कसा आहें हेंहि मला माहीत आहे आणि ज्या तरुणीवर माझं प्रेम नसेल तिला मी कांहींहि देऊं शकणार नाहीं हेंहि बिसरलेलो नाहीं मी.

**ॲन** : ( उजवीकडील टेबलाच्या वरील भागाशीं येऊन ) म्हणजे तुमचं माझ्यावर प्रेम आहे एब ?

**एब** : ( उठून उभा राहत–अतिशय जिव्हाळ्यानें ) होय–तेंच म्हटलं मी आत्तां. ( तो तिच्या समोर जाऊन उभा राहतो. ती त्याच्याकडे आसुसलेल्या दृष्टीनें पाहूं लागते. ) फार दिवसांपासून मी प्रेम करतों आहें तुझ्यावर अगदीं अंतःकरणापासून. तुला जाणीव नसेल ॲन–पण तुझ्यांत कांहींतरी विशेष आहे. तूं बुद्धीनं शहाणी आहेस–वृत्तीनं शूर आहेस–हे दोन गुण विशेष आवडतात मला. तुझं सौंदर्यहि मनाला वेध लावणारं आहे. तेव्हां तुझ्याबद्दल मला अतिशय आदर वाटावा हें साहजिकच आहे. पण असं असलं तरी ॲन, यामुळें तूं आपल्या डोक्याला त्रास करून घेण्याची जरुरी नाहीं. मीं माझ्या भावना एवढ्याचसाठीं उघड केल्या कीं, तूं कांहीं काळ माझ्याशीं मित्रत्वानं वागलीस तर लोकांच्या जिभांना त्यामुळें कदाचित् लगाम बसेल. दुसऱ्या कोणाच्या तरी–नव्हे–माझ्याच प्रेमपाशांत अडकल्यामुळें तूं मॅकनीलचा त्याग केलास असा त्यांचा समज होईल. ( ॲन त्याच्याजवळ जाऊन आपला हात त्याच्या हातावर ठेवते. )

**ॲन** : एब, तुला मीं नीट ओळखलं आहे असं वाटत होतं मला–पण माझा निव्वळ भ्रमच होता तो.

**एब** : असं कां म्हणतेस ? माझ्या आतांच्या बोलण्यावरून मी कांहींसा फाजील स्पष्ट आहें असं तुला वाटलं काय ?

**ॲन** : ( गंभीरपणें ) मुळींच नाहीं एब. मी तुमच्याबद्दल कितीदां तरी विचार करीत असें-अर्थात् माझ्या दृष्टिकोनाप्रमाणें. पण तुमचं माझ्यावर प्रेम-ही कल्पनासुद्धां या घटकेपर्यंत माझ्या मनाला कधीं शिवलेली नाहीं. मी अगदीं बावरुन गेलें आहे-या दृष्टीनें मीं कधीं पाहिलंच नाहीं तुमच्याकडे–मी तुमच्याकडे आतां अगदीं नव्यानेंच पहातें आहें असं वाटतं आहे मला—

**एब** : ( शांतपणानें ) तुला माझ्याविषयीं कांहीं तरी वाटावं असा माझा सुतराम् आग्रह नाहीं. तसं कधीं स्वप्नांतसुद्धां येणार नाहीं माझ्या.
**ॲन** : मला माहीत आहे तें एब. आपण आपलं सर्वस्व दुसऱ्याला देऊन टाकावं आणि तेंहि अगदीं निरपेक्ष भावानं, अशीच वृत्ति आहे तुझी. आतांपर्यंत ज्या माणसांची मला माहिती आहे त्यांच्याहून तूं सर्वस्वी निराळा आहेस; आणि सत्याला स्मरून मी आतांच तुला असं आश्वासन देतें कीं, जर मी कधींकाळीं तुझ्यावर प्रेम करूं शकलेंच तर मला अतिशय आनंद होईल; इतकंच नव्हे, तर त्यामुळें मी एका अतिशय सज्जन आणि सभ्य माणसावर प्रेम करीत आहें या जाणिवेनें मी स्वतःला धन्य समजेन. एब, कृपा करून याबद्दल विचार करायला मला थोडी फुरसद देशील का?
**एब** : ( आपल्या डोळ्यांवर व कानांवर विश्वास न बसल्यामुळें गोंधळून ) आणखी थोडा अवधि मिळाला तर तुझ्यासंबंधानं माझ्या मनांत जी भावना आहे ती माझ्याविषयीं तुझ्याहि मनांत निर्माण होणं अशक्य नाहीं, असाच का तुझ्या बोलण्याचा अर्थ ?
**ॲन** : ( अंतःकरणाच्या ओलाव्यानें ) तें मला कांहींच समजत नाहीं एब. पण मला हें मात्र नक्की समजतं कीं, तूं कोणाचंहि अंतःकरण भारून टाकशील इतकंच नव्हे तर त्याला नवचैतन्य देशील; त्या व्यक्तीला पुन्हां माणसांत आणशील. ( तो तिच्याकडे इतक्या अनिमिष दृष्टीनें पहातो कीं, ती त्याची दृष्टि चुकवून दुसरीकडे पाहूं लागते. तो तिचा एक हात आपल्या दोन्ही हातात धरून तो घट्ट दाबतो. कांहीं वेळपर्यंत तो कांहीं बोलूं शकत नाहीं. )
**एब** : ॲन, आपल्या देशांतील पुढारी आपल्याला नेहमीं असं सांगत असतात कीं, आपल्या देशांत प्रत्येक व्यक्तीला समान संधि आहे. त्यांच्या त्या बोलण्यावर विश्वास ठेवण्याचा मीं आतांपर्यंत अनेकदां कसून प्रयत्न केला; पण परमेश्वरानं आपली प्रतिकृति म्हणून मानव जन्माला घातला यावर जसा माझा फारसा विश्वास नाहीं तसाच त्या पुढाऱ्यांवरहि माझा विश्वास बसला नाहीं. पण ॲन, तूं जर माझ्या प्रेमाचा स्वीकार केलास तर मीं आजपर्यंत जें प्रत्यक्ष पाहिलेलं आहे, तो मी भास समजेन आणि जें मीं

३...

कधीं स्वप्नांतसुद्धां पाहिलेलं नाहीं तेंच काय तें खरं असं मी ठामपणें मानूं लागेन. ( दोघंहि कांहीं वेळ स्तब्ध राहतात. ) पण तूं माझ्या प्रश्नाचं आत्तांच उत्तर दिलं पाहिजेस असा माझा बिलकुल आग्रह नाहीं; आणि तो अधिकार मला प्राप्त झाला आहे अशी माझ्या मनाची खातरजमा झाल्याशिवाय तुझ्याकडून तें उत्तर मिळविण्याचा आग्रह मी धरणारहि नाहीं. ( तो तिचा हात सोडून देतो. नंतर एक वृत्तपत्र घेऊन दाराकडे जातो. )

**ॲन :** कुठं चाललास तूं, एब ?

**एब :** बाउलिंग ग्रीनना भेटून त्यांना एक गंमत सांगायची आहे मला. ( जाऊन दारांत उभा राहतो. )

**ॲन :** ( गांगरून ) गंमत ? आणि ती कसली ?

**एब :** इलिनॉईझच्या कायदेमंडळाच्या निवडणुकीसाठीं मी उमेदवार म्हणून उभं राहायचं ठरवलं आहे हें सांगणार आहें मी त्यांना—( जातो–प्रकाश कमी कमी होऊं लागतो. )

# दृश्य ३ रें

न्यू सालेमजवळील बाउलिंग ग्रीनचें घर. खोली लहानशीच आहे पण तींत ग्रंथ आणि चित्रें लावलेलीं आहेत. मध्यभागीं एका टेबलावर एक दिवा लावलेला आहे. काचेच्या हंडींत एक मेणबत्ती उजव्या बाजूला पण मागें पुस्तकांचें कपाट असतें त्यावर ठेवलेली. टेबलाच्या दोन्ही बाजूंना खुर्च्या असून डाव्या बाजूला एक कोच आहे. मागील बाजूला डाव्या अंगाला पुढचा दरवाजा असतो. दाराजवळील भिंतीशीं बंदूक उभी ठेवलेली असते. उजव्या बाजूकडील भिंतीलाहि एक दरवाजा असतो. उजव्या बाजूला मागील अंगाला एक शिडी असून ती पोटमाळ्याकडे गेलेली असते. दुसऱ्या दृश्यानंतर एका वर्षाचा अवधि लोटलेला असतो. बाहेर वादळ उठलं आहे.

बाउलिंग एक चोपडें मोठ्यानें वाचीत आहे. त्याची सुखी पत्नी नॅन्सी तें ऐकत आहे व हातानें तिचें विणकाम चाललें आहे.

**बाउलिंग :** ( वाचतो. ) त्याच्या अनुयायांकडून ' पिकविक ' ज्या नांवाच्या पुकारा झाल्यावर तो प्रथितयश पुरुष पूर्वीप्रमाणेंच पुन्हा त्या खुर्चीवर आरूढ झाला हें दृश्य किती मजेदार दिसलं असेल, नाहीं ? त्या खुर्चीवर बसून त्यानें ज्या क्लबाला जन्मास घातलें त्यालाच उद्देशून त्यानें भाषण केलें—( तो खदखदतो–नॅन्सी मोठ्यानें हसते. )

**नॅन्सी :** तुमचीच हुबेहूब प्रतिमा आहे म्हणायचा तो ! ( दारावर थाप ऐकूं येते नॅन्सी कावरीबावरी होते. ) एब नाहीं हा–मग कोण आलं असावं अशा वेळीं ?

**बाउलिंग :** ( उठून ) मला तरी कसं कळावं तें ?

**नॅन्सी :** कोणीहि असलं तरी वेळ अवेळ कांहीं आहे कीं नाहीं ?(बाउलिंग दाराची कडी काढून तें उघडतो. जॉश स्पीड आलेला असतो. )

**बाउलिंग :** कोण ? जॉश स्पीड ? आणि या वेळीं ?

**जॉश :** हं काय करणार ?

**बाउलिंग :** किती दिवसांनीं दिसतो आहेस रे तूं ?

**नॅन्सी :** खरंच—

**जॉश :** ( तिच्याजवळ जाऊन ) कसं काय मिसेस ग्रीन ? अशा अवेळीं आल्याबद्दल माफ करा हं मला—

**नॅन्सी :** तुम्ही आलांत म्हणून आम्हांला उलट आनंदच झाला आहे, स्पीड. ओव्हरकोट काढून ठेवा ना—

**जॉश :** ( दाराशीं जाऊन ओव्हरकोट व हॅट काढून ठेवीत ) आभारी आहें मी तुमचा. आत्तां स्प्रिंगफील्डहूनच आलों मी. एब लिंकन इथं आला आहे म्हणे आणि आपल्या घरीं तो नक्की भेटेल असं सांगण्यांत आलं मला.

**बाउलिंग :** आमच्या पोटमाळ्यावर झोपायला असतो तो—

**नॅन्सी :** आतां रतलीज फार्मवर गेले आहेत ते–बिचाऱ्या ॲनचा समाचार घ्यायला—

**जॉश :** मिस् रतलीजचा ? काय झालंय् तिला ?

**नॅन्सी :** मेंदूवर परिणाम झाला आहे तिच्या. फार भयंकर असतो हा रोग. सांथच आली आहे या रोगाची—किड्यांसारखीं मरताहेत माणसं–

**बाउलिंग :** पण ॲनचं तरुण रक्त आहे–ती निभावेल या दुखण्यांतून. बस ना जॉश—

**जॉश :** ( डाव्या बाजूच्या कोचाशीं जाऊन ) हो—( बसतो. बाउलिंग पुस्तकांच्या कपाटाशी जाऊन पाईपात तंबाखू भरून तो शिलगावतो. )

**नॅन्सी :** एब व्हॅंडोलियाला होते–माहीत आहे तुम्हांला ? ॲन आजारी पडल्याचं समजल्याबरोबर धावतच आले ते इथं. खरंच, त्यांचं तिच्यावर किती प्रेम आहे !

**बाउलिंग :** बेडकाचा बैल करण्यांत काय अर्थ आहे नॅन्सी ? ( जॉश हें सगळें बोलणें अतिशय आतुरतेनें ऐकत असतो. )

**जॉश :** अस्सं ! म्हणजे एब प्रेमाच्या पाशांत सांपडला आहे म्हणायचा ! अलीकडे त्याला झालंय् तरी काय असं राहून राहून वाटत असे मला—

**नॅन्सी :** त्यांत गुप्त अस काय आहे ? त्याच्या दीन मुद्रेवर तें लिहिलेलें स्पष्ट दिसत नाहीं का ?

**जॉश :** माझी नि त्याची शेवटची भेट झाली तेव्हां तो मला कसल्या तरी विचारांत गढून गेल्यासारखा दिसला. मीं त्याला त्याबद्दल विचारलंसुद्धां. तेव्हां तो म्हणाला होता कीं, आपली लिव्हर बिघडली आहे जरा—

**बाउलिंग :** ( हंसून ) शक्य आहे तें. असेंब्लींत तरी बरं चाललं आहे का त्याचं ?

**जॉश :** कसलं बरं ? नुसता बसून असतो तो तिथं. तीन डॉलर्स भत्ता घेतो नुसता–कुठल्याच कामकाजाकडं त्याचं लक्ष नसावं असं दिसतं. बरं पण मिस् रतलीजचं तरी त्याच्यावर प्रेम आहेसं वाटतं का तुम्हांला ?

**नॅन्सी :** त्याबद्दल शंकाच नको. एबकरतां तर तिनं मॅकनीलला दिलेलं लग्नाचं वचन मोडलं—

**जॉश :** तो तिच्याशीं लग्न करणार आहे का ?

**नॅन्सी :** मला वाटतं, निदान सध्यां तरी त्याच्या डोक्यांत हाच एक विचार आहे–आणि जितक्या लौकर त्यांचं लग्न होईल तितकं चांगलं—

**बाउलिंग :** तिच्या दृष्टीनं असेल चांगलं–पण याच्या दृष्टीनं वाईटच.

**नॅन्सी :** आणि तें कां ? हॅंक्स आणि लिंकन या त्याच्या घराण्यांपेक्षां रतलीज घराणं प्रत्येक बाबतींत उजवं आहे—

**बाउलिंग :** हिला नाहीं तरी जॉश, तुला पटेल माझं म्हणणं. एबचं सारंच काम न्यारं आहे. ॲन मोठी गोड आणि चुणचुणीत पोरगी आहे हें तर खरंच पण लग्न झाल्यावर ती त्याच्या मार्गांतली धोंडच होऊन राहणार.

**जॉश :** जें सुख त्याला आतांपर्यंत कधींहि अनुभवायला मिळालेलं नाहीं तें ती त्याला देऊं शकली तर ती त्याच्या मार्गांत धोंड होऊन बसल्याबद्दलहि मला फारसं कांहीं वाटणार नाहीं.

**नॅन्सी :** अगदीं बरोबर. एबबद्दल तुम्हांला वाटतं तितकंच मलाहि वाटतं, बाउलिंग. पण तो दारिद्र्यानं गांजून गेला आहे, व्यापारधंद्यांत त्याचे हात पोळले आहेत, एका वर्षाच्या अवधींत तो कायदेमंडळांत कांहींहि करूं शकलेला नाहीं हें तर नाहीं ना आपण विसरूं शकत ?

**बाउलिंग :** त्यानं स्प्रिंगफील्डला जाऊन वकिली सुरू करावी. या कामांत निनिअन एडवर्ड्सची चांगली मदत होईल त्याला—आणि असं केल्यानं त्याला ॲनचाहि आपोआप विसर पडेल. जें अत्यंत सुंदर आहे पण जें कधींच हातीं लागणं शक्य नाहीं असं कांहीं तरी अप्राप्य वरदान म्हणून तो ॲनकडे पाहतो आहे. एकदां ती त्याला प्राप्त झाली—त्याचं तिच्याशीं लग्न झालं म्हणजे ती त्याचं अंतःकरण खात्रीनें विदीर्ण करून टाकील.

**नॅन्सी :** ( डाव्या अंगाच्या टेबलाशीं येऊन बसते. ) यांचं हें बोलणं तुला पटतं स्पीड ?

**जॉश :** तसंच कांहीं नाहीं. पण खरं सांगूं का मिसेस् ग्रीन ? एब लिंकन-बद्दल मी कसलंच भविष्य सांगूं शकत नाहीं. तो 'टॅलिस्मन' आगबोट चालवीत असे तेव्हां त्याला पहिल्यानं पाहिलं मीं. त्या धरणांत त्या बोटीचं काय झालं तें आठवतच असेल तुम्हांला. माझ्या वडिलांच्या वखारीसाठीं मागविलेलं कितीतरी मौल्यवान सामान होतं त्या बोटींत. ती बोट आणि तिच्यांतलं सगळं सामान—सगळ्याचा निकाल लावणार असंच वाटलं होतं मला. पण एबनं मोठ्या शिताफीनं बोट वांचवली. कमाल केली त्यानं. मीं म्हटलं, 'वाहवा रे मर्द !' मीं त्याच्याशीं परिचय करून घेतला. मी त्याला कीर्ति आणि संपत्ति यांचा लाभ करून देऊं शकेन अशा ऐटींत होतों मी. पण त्या माझ्या भ्रमाचं लौकरच निरसन झालं. त्याचं शरीर-सामर्थ्य अफाट आहे आणि त्याचं धैर्य अमाप आहे. पण मनानं तो

अगदींच वैफल्यग्रस्त असल्याचं माझ्या लौकरच प्रत्ययाला आलं. तो लाकडाचे ओंडके फोडूं शकतो, नांगर चालवूं शकतो, सारा दिवस विनोद करीत असतो आणि मग रात्रभर ' हॅम्लेट ' वाचीत बसतो. वाचतांना हॅम्लेटच्या परिस्थितीशीं आपली परिस्थिति ताडून पहात असतो तो. हा एब म्हणजे एक तर तत्त्वज्ञ तरी असावा नाहीं तर महामूर्ख तरी असावा! खरोखर कोण आहे तें देव जाणे!

**बाउलिंग :** ( हसून ) जॉश, एबचे सगळे गुणावगुण ओळखण्याची तुझ्या-इतकी जर ॲनला अक्कल असती तर माझी पक्की खात्री आहे कीं, भीतीनं तिचा रथकाप उडाला असता आणि यॉर्क स्टेटकडे धावत सुटून तिनं मॅकनीलला गांठलं असतं. त्याच्या स्वभावांत निदान याच्यासारखा गुतागुंत तरी नाहीं.

**नॅन्सी :** ( कांहींशीं भावनावश होऊन ) एखाद्या पुस्तकांत एखादं कोडं असावं आणि त्याचं उत्तर शोधण्याचा प्रयत्न करावा तसंच तुम्ही एब लिंकनसंबंधानं बोलतां आहांत. तो म्हणजे एक कोडं असला तरी तो एक माणूस आहे—शिवाय दुर्दैवीहि आहे. त्याला तुम्ही सहानुभूति दाखवतां म्हणजे काय करतां ? त्यानं विनोदी कोटी केली म्हणजे पोट धरून हसतां, निवडणुकीच्या दिवशीं त्याला मतं देतां आणि त्याला जरुरी असेल तेव्हां त्याच्या राहण्याजेवण्याची सोय करतां. ( पुस्तकांच्या कपाटाशीं जाऊन ) पण एवढ्यानं एबच्या आत्म्याला जरामुद्धां समाधान वाटत नसेल—वाटणारहि नाहीं. त्याला खरोखर कसली जरूरी असेल तर त्याच्यासाठीं जीवनाच्या धकाधकीला जी छातीठोकपणें तोंड देऊं शकेल अशा स्त्रीची.

**बाउलिंग :** म्हणजे असं करण्याची त्याची स्वतःची छाती नाहीं, असं कां तुला म्हणायचं आहे ?

**नॅन्सी :** होय—असंच मला म्हणायचं आहे. त्याचं बालपण जंगलांत गेलं, तिथंच तो लहानाचा मोठा झाला. अजूनहि त्याला एकान्त हवासा वाटला की तो जंगलाचीच वाट धरतो. लहानपणापासून त्याला लोकापवाद ऐकून घ्यावे लागले आहेत. त्याच्या पाठीमागें सगळ्या बायकांचा हाच विषय चालतो—याची मरून गेलेली आई आणि आईची आई—सभ्यतेच्या कोष्टकांत

बसण्यासारखी नव्हती ती. या लोकापवादाचा अर्थ काय, त्यामुळें जग आपली काय किंमत करतं, याचा त्याला कांहींच अंदाज नसल्यामुळें त्याला नेहमीं भीतीनं पछाडलेलं असतं आणि तुम्हीं सर्वांनीं असं नुसतं थातुरमातुर केल्यानं त्याची ती भीति नष्टहि होणं शक्य नाहीं. ज्या स्त्रीचं त्याच्यावर खरं प्रेम असेल, जिची त्याच्यावर पूर्ण निष्ठा असेल अशी स्त्रीच या भीतीपासून त्याची मुक्तता करूं शकेल. ( कोणीतरी दार ठोठावतें. )

**बाउलिंग** : एब्र आला वाटतं–( जाऊन कडी काढतो. एब्र आंत येतो. तो बोडका दिसत असून भिजून चिंब झालेला असतो. त्याच्या अंगावरील कपडे बऱ्यापैकीं असतात. तो बराच उतरलेला आणि संत्रस्त दिसतो. ) का रे एब्र, तुझीच वाट पहात बसलों आहोंत आम्ही. आंत ये ना– ( एब्र आंत येतो. बाउलिंग दाराला कडी लावून घेतो–व शेकोटीजवळ जातो. )

**नॅन्सी** : हे स्पीड आले तेव्हां 'पिकविक क्लबचें समाप्तीनंतरचें दप्तर' वाचीत होतों आम्ही—

**एब्र** : अरे वा जॉश ! बरं झालं, तुझी भेट झाली.

**जॉश** : तुझ्या भेटीनं मलाहि आनंद झाला.

**एब्र** : ( नॅन्सीकडे पाहून ) नॅन्सी—

**नॅन्सी** : काय एब्र ?

**एब्र** : वारली ती—

**बाउलिंग** : काय ? ॲन वारली ?

**एब्र** : होय. आज रात्रीं तिच्या दुखण्यानं एकदम जोर केला–कोणाला कांहींच उपचार करतां आला नाहीं. ( नॅन्सी एब्रजवळ जाऊन त्याचा हात धरते. )

**नॅन्सी** : अयाई–फार वाईट झालं हो एब्र ! ( वळून उजव्या बाजूला जाते. ) पोरगी मोठी गोड होती बिचारी. तिला ओळखणाऱ्या समळ्यांनाच भयंकर दुःख होईल.

**एब्र** : खरं आहे. पण त्याचा उपयोग काय ? ती कांहीं आतां परत येत नाहीं.

**बाउलिंग** : आधीं तूं खालीं बस पाहूं एब्र–आणि विश्रांति घे थोडीशी.

**एब :** नाहीं–माझा सहवास कोणालाच रुचण्यासारखा नाहीं. मी इथून जावं हेंच बरं—( जाऊन दाराची कडी काढतो. नॅन्सी झटक्यानें वळून पहाते. )

**जॉश :** ( त्याला थांबवून ) जाऊं नको एब. इथंच थांबलं पाहिजे तुला.

**बाउलिंग :** खरंच एब. जॉ॑ चं म्हणण बरोबर आहे.

**नॅन्सी :** ( मधल्या खुर्चीशीं जाऊन ) इकडे या ना एब. इथं बसा पाहूं. ( एब सर्वांकडे आळीपाळीनें पहातो व शेवटीं डावीकडील टेबलापुढें खुर्चीवर बसतो ) वर तुमचं अंथरूण घालून ठेवलेलं आहे–केव्हांहि वर जा.

**एब :** ( उद्वेगानें ) या जगांत तुम्हीच काय ते माझे मित्र आहांत–आणि या तुमच्या मैत्रीची कशानं फेड करण्याचं माझ्या नशिबीं आलं? तर कुणाच्या तरी मृत्यूची वार्ता सांगून—

**बाउलिंग :** एब, तुझं घर आहे हें–इथल्या सगळ्यांचं तुझ्यावर प्रेम आहे.

**एब :** त्याची जाणीव आहे मला. तुम्हां पतिपत्नींवर माझंहि प्रेम आहे. पण तिच्याइतकं मात्र मी आजपर्यंत कोणावरहि प्रेम केलेलं नव्हतं.

**नॅन्सी :** खरं आहे एब. ( त्याच्याजवळ जाऊन ) अगदीं खरं आहे.

**एब :** एकाकी राहणं बरं असं वाटत असे मला. मी एकटा असलो म्हणजेच अगदीं सुखांत असें मी. लोकांच्या फार जवळ गेलं म्हणजे त्यांचं सत्यस्वरूप तुम्हांला दिसूं लागतं, बाह्य आवरणांच्या आड दडलेलीं त्यांचीं वेडींविद्रीं मनं तुम्हांला दिसूं लागतात आणि त्या लोकांनाहि आपल्यासंबंधानं तसाच अनुभव येतो असा एक विक्षिप्त समज होता माझा. पण मग–मीं तिला पाहिलं आणि लोकांत सौंदर्य आणि पावित्र्य—रात्रीच्या वेळीं कधीं कधीं आपल्याला आकाशांत दिसूं शकतं तसल्या प्रकारचं पावित्र्य–हीं असूं शकतात याचा मला प्रत्यय आला. तिचा हात मीं माझ्या हातांत घेतला, घट्ट धरला कीं, माझी सारी भीति, माझ्या सगळ्या शंकाकुशंका कुठल्या कुठं पळून जात. परमेश्वराचं अस्तित्व मला पटूं लागे. जीवनांत तिला जें जें हवंसं वाटलं असतं तें तें सर्व तिला मिळवून देण्यासाठीं रात्रीचा दिवस करून श्रम करण्यांत मला निरतिशय आनंद झाला असता. मी असं करूं शकेन असं तिला मात्र वाटायला हवं होतं म्हणजे मीं तसं केलंच असतं–अशी श्रद्धा होती माझी...आणि असें

असतांना भोंवऱ्यांत सांपडलेल्या एखाद्या डहाळीसारखा असहाय्य होऊन मी नुसता पहात—मृत्यु तिच्यावर आपली झडप घालीत असलेली पहात—स्वस्थ उभा होतों. तिच्या आत्म्याला सद्‌गति मिळावी म्हणून तिचे आई-बाप परमेश्वराची प्रार्थना करीत होते—परमेश्वर देतो आणि परमेश्वरच घेऊनहि जातो—परमेश्वरी लीला अजब खरी ! असंच म्हणत होते ते आपल्या प्रार्थनेंत. पण मला त्यांच्याबरोबर प्रार्थनाहि करवेना. मृत्यूचं सामर्थ्य ज्याच्याजवळ आहे आणि जो त्या सामर्थ्याचा उपयोगहि करतो त्याला आळविण्याची मला इच्छा होईना. ( उठून उभा राहतो. ) माझ्या दुबळेपणाचं प्रदर्शन करतों आहे मीं हें. माफ करा मला—पण नाहीं, मला आतां हे सहन होत नाहीं. मला आतां जिवंत राहातां येणं अशक्य आहे. मला मेलंच पाहिजे—मला जाऊन तिला भेटलंच पाहिजे—नाहीं तर माझ्या मेंदूच्या ठिकऱ्या उडतील. ( जाऊन दाराची कडी काढतो. तें उघडून बाहेर पहात ) ती एकटी आहे बिचारी तिकडे—नाहीं—हा विचारच सहन होत नाहीं मला ! ( नॅन्सी बाउलिंगकडे भीतीनें पाहते तो एब-जवळ जातो. )

**बाउलिंग :** ( ममतेनं ) एब, वर जाऊन स्वस्थ पड बघूं तूं—थोडी झोप मिळाली म्हणजे बरं वाटेल तुला. असं काय ? माझ्यासाठीं आणि या नॅन्सीसाठीं माझं ऐकलंच पाहिजे तुला.

**एब :** ( कांहीं वेळानें ) ठीक आहे बाउलिंग— वळून शिडीकडे जाऊं लागतो. )

**नॅन्सी :** ( पुस्तकांच्या कपाटांतून एक मेणबत्ती काढून ) ही मेणबत्ती घ्या ना बरोबर—( मेणबत्ती त्याच्या हातांत देते. )

**एब :** आभारी आहें मी नॅन्सी— ( तो शिडी चढूं लागतो. सर्वजण त्याच्याकडे बघत असतात. )

**नॅन्सी :** ( साश्रु नयनांनीं ) काय बिचाऱ्याची स्थिति झाली ही ! ( बाउलिंग तिला गप्प राहण्याविषयीं सुचवतो. )

**जॉश :** ( अंगांत कोट चढवीत ) मिसेस ग्रीन, त्याला संभाळा हां इथं. तुमचं सतत लक्ष असूं द्या त्याच्यावर. येतों मी —

**बाउलिंग :** हें का सांगायला पाहिजे ? ( जॉश बाहेर जाऊन दरवाजा ओढून घेतो. ) बाउलिंग आंतून कडी लावतो व टेबलापाशीं जाऊन दिवा उचलतो. नॅन्सी एकदां पेटमाळ्याकडे पहाते व उजव्या हाताच्या दारानें निघून जाते. बाउलिंग दिवा मालवून तिच्या मागून जातो. गेल्यावर दरवाजा ओढून घेतो. पेटमाळ्याच्या फटींतून उजेडाचा एखादा किरण रंगमंचावर पडलेला दिसतो—बाकी सर्व अंधार असतो. )

२



## दृश्य ४ थें

स्प्रिंगफील्डमधील कोर्टहाऊसच्या दुसऱ्या मजल्यावर असलेली कायद्याचे सल्लागार स्टुअर्ड आणि लिंकन यांची कचेरी. मागील अंक संपल्यानंतर पांच वर्षांचा अवधि लोटलेला आहे. चांगलें ऊन पडलें आहे. कचेरीची खोली लहानशी असून तिला एक दरवाजा व दोन खिडक्या आहेत. मागील बाजूच्या दारांतून दिवाणखान्याकडे व जिन्याकडे जाण्याचा रस्ता आहे. मागील बाजूस एक मेज व एक खुर्ची आहे. डाव्या बाजूला एक जुनाट डेस्क असून त्याच्यावर कागदपत्र इतस्ततः पडलेले आहेत. उजव्या बाजूला एक ओबडधोबड बिछाना असून त्याच्यावर रेड्याच्या कातड्याचें आच्छादन आहे. खिडकीखालीं कांहीं शेल्फ्स् असून त्यांत कायद्याचीं पुस्तकें ठेवलेलीं आहेत. खोलींत एक जुनाट लाकडी शेगडी आहे. डेस्कच्या वरील भिंतीवर सव्वीस ताऱ्यांनीं अंकित असा अमेरिकेचा ध्वज लावलेला आहे. दोन खिडक्यांच्या मध्यें निवडणुकीचा जाहीरनामा लावलेला असून हॅरिसन व टायलर हे उमेदवार असल्याचें जाहीर करण्यांत आलें आहे. मतदारांची यादीहि लावण्यांत आलेली असून यादींत शेवटचें नांव सॅंगॅमॉनचा एब्रहाम लिंकन याचें आहे. बिली हर्न्डन टेबलाशीं काम करीत आहे. तो तरुण असून कांहींसा कृश, गंभीर वृत्तीचा व आंतल्या आंत धुमसत असावा असा दिसतो. एब आंत येतो तेव्हां बिली त्याच्याकडे पहातो. एबच्या डोक्यावर वेडीवांकडी फ्रुग हॅट, अंगांत अलपाकचा कोट व हातांत जुन्या पद्धतीची बॅग असते. त्याला बोलण्याची इच्छा नसावी असें दिसतें. त्याचे बूट चिखलांत बरबटलेले दिसतात. तो ऑफिसचा

दरवाजा उघडाच ठेवतो, त्याच्यावर ४ असा आंकडा दिसतो—ऑफिसचें नांवहि लिहिलेलें दिसतें—' स्टुअर्ट अँड लिंकन, अॅटर्नीज' ( कायद्याचे सल्लागार. )' एब सरळ डेस्कजवळ जातो.

**बिली** : ठीक आहे ना लिंकन ? तुम्हांला परत आलेले पाहून बरं वाटलं.

**एब** : तुझं ठीक आहे ना बिली ? ( बॅग खालीं ठेवतो. हॅट काढून तिच्यांत असलेले कागद बाहेर काढतो व नंतर हॅट रॅकवर ठेवतो. कागद डेस्कवर फेकतो. )

**बिली** : तुमचा दौरा कसा काय झाला ?

**एब** : नेहमींसारखाच.

**बिली** : तुमची प्रकृति तर ठीक होती ना ?

**एब** : ठीक म्हणजे तशी ठीक होती. मी मध्येंच आजारी पडूं नये म्हणून डॉ. हेन्री सारखीं औषधं पाजीत होते मला. ( त्याच्या गैरहजेरींत आलेले कागदपत्र व पत्रें वाचण्यांत एब गढून जातो. त्यांचें त्याला फारसें महत्त्व वाटत नाहीं असें दिसतें. कांहीं पत्रें तर लिफाफा फोडल्याशिवायच तो बाजूला ठेवतो.

**बिली** : राजकीय विषयांवर भाषणं करण्याची संधि मिळाली कीं नाहीं तुम्हांला ?

**एब** : कांहीं ठिकाणीं त्यांनीं लावलं मला भाषणं करायला. स्टीव्हन डग्लसचा दौरा चालू होता—त्याला उत्तर देण्यासाठीं उभं केलं होतं त्यांनीं मला—सार्वजनिक सभांतच आमचीं प्रश्नोत्तरं झडलीं.

**बिली** : ( विशेष कुतूहल वाटल्यामुळें उठून व एबजवळ जाऊन ) अरे वा ! तुमचीं आणि डग्लसचीं प्रश्नोत्तरं तरी कशावर झालीं ?

**एब** : बिली, इतका जोरांत येऊं नकोस ! आम्ही दोघेहि त्याला कांहीं फारसं महत्त्व देत नव्हतों; तशी आमची मारामारीहि विशेष झाली नाहीं. तें जाऊं दे—इकडली काय बातमी आहे ?

**बिली** : आपण वॉशिंग्टनमध्यें सुखरूपपणें पोहोंचल्याचं जज्ज स्टुअर्ट यांनीं कळविलं असून तिकडील निवडणूक प्रचाराचं वातावरण सध्यांच्या हवेसारखंच अगदीं गरमागरम झालं असल्याचं म्हटलं आहे त्यांनीं. तुमची फी

आपण कांहीं दिवस तरी देऊं शकणार नाहीं असं मिसेस फ्रेनचं म्हणणं आहे.

**एब** : तिनं मला फी देतांच कामा नये. मीं तिच्या नवऱ्याचं वकीलपत्र घेतलं होतं– त्याला फांशीची सजा झाली—मींच कांहींतरी दिलं पाहिजे तिला—

**बिली** : ( एक पाकीट एबच्या हातात देऊन ) हें पत्र एका माणसानं आणून दिलं–मी तें आवर्जून तुमच्या सुपूर्द करीन असं वचन दिलं होतं मीं त्याला. फ्रीमनच्या एलायजा पी. लव्हजॉय लीगकडून आलेलं आहे तें. पुढच्या गुरुवारीं संध्याकाळीं गुलामगिरी-विरोधकांची रॅली आहे–त्या प्रसंगीं तुम्ही भाषण करावं अशी इच्छा आहे त्यांची. त्या प्रसंगाचं महत्त्वच तसं विशेष आहे.

**एब** : ( बिलीकडे वळून विचारपूर्वक ) मोठी गंमत आहे बिली. लव्हजॉय-बद्दल सहज विचार करीत होतों मी त्या दिवशीं–हुतात्मा होण्यांत माण-साला एवढं भूषण कां वाटावं असा प्रश्न उपस्थित झाला माझ्या मनांत. मी बोटींतून क्विन्सीहून आल्टनला येत होतों तेव्हां बारा नीग्रोंना घेऊन एक सद्‌गृहस्थहि येत होता. तो त्यांना विकण्यासाठीं व्हिक्सबर्गला घेऊन जात होता. सहासहा जणांच्या दोन तुकड्या करून त्यांना त्यानें साखळदंडानें बांधून ठेवलं होतं. त्या प्रत्येक नीग्रोच्या मनगटावर बेडी अडकविलेली होती आणि ती मुख्य सांखळदंडाशीं बांधण्यांत आलेली होती–माशांना एका दोरींत अडकवून ठेवतात ना? तसंच. ते सगळे नीग्रो आपल्या घरादारांना मुकले होते–आई, बाप, बायको, मुलं, सारे आप्तइष्ट यांना कायमचे दुरावले होते! ते गुलाम झाले होते–कायमचे–जन्माचे गुलाम झाले होते–त्याबद्दल कोणी विचारपूसहि करणार नव्हतं. माझ्या अंगावर तर कांटा उभा राहिला तें दृश्य पाहून—

**बिली** : ( उत्तेजित होऊन ) मग लव्हजॉय रॅलीच्या प्रसंगीं तुम्ही भाषण करणार तर?

**एब** : ( कंटाळल्यासारखा ) कांहीं सांगवत नाहीं. फ्रीमन्स लीग म्हणजे नुसतीच बोंबाबोंब करणाऱ्या शुद्ध माथेफिरूंची लीग आहे ती. ( बिली वळून उजव्या बाजूच्या मेजाच्या मागें येतो. ) त्या लोकांशीं कसलाहि

युक्तिवाद करूं लागलं कीं ते तुम्हांला प्रतिपक्षाचे मिंधे समजून शिवीगाळ करूं लागलेच ! ( एब एक वृत्तपत्र उघडतो. तें वाचूं लागतो. हर्न्डन त्याच्याकडे चिडीनें आणि निराशेनें पाहतो, पण एबशीं युक्तिवाद करण्यांत कांहीं अर्थ नाहीं अशा खात्रीनें तो आपलें काम करूं लागतो. ) त्यांनाच काय बोंबलायचं असेल तें बोंबलूं दे—( थोड्याच वेळानें बाउलिंग ग्रीन व त्याच्या मागोमाग जॉश स्पीड प्रवेश करतात. )

**बिली :** लिंकन, मला आपल्याला असं विचारायचं आहे—

**बाउलिंग :** कायदेसम्राटांना आमची अडचण होणार आहे कीं काय ?

**एब :** कोण–बाउलिंग ? ( पुढें होऊन त्याच्याशीं हस्तांदोलन करतो. ) कसं काय ? ठीक आहे ना ?

**बाउलिंग :** हो–वा ! तुझी भेट झाली–आनंद झाला मला.

**एब :** आपण भेटल्यानं मलाहि अतिशय आनंद झाला. हे बिली हर्न्डन– हे न्यू सालेम येथील मिस्टर ग्रीन. हं–कसं काय जॉश ?

**जॉश :** तुझं ठीक आहे ना एब ?

**बिली :** आपली ओळख झाली म्हणून धन्यता वाटते आहे मला. लिंकनच्या बोलण्यांत आपलं नांव कितीदां तरी निघतं—

**बाउलिंग :** चालायचंच. हर्न्डन, आपणहि वकिली करतां वाटतं ?

**बिली :** ( गंभीरपणें ) माझी इच्छा आहे. तशी जज्ज स्टुअर्टच्या गैर-हजेरींत मी इथं कारकून म्हणून काम करीत असतों.

**बाउलिंग :** म्हणजे एब, आतां तूं इतरांना धडे देऊं लागला आहेस म्हणायचा !

**एब :** छे. वकिली कशी करूं नये, याचं उदाहरण समोर ठेवतों आहें––

**बाउलिंग :** शक्य आहे. त्या डेस्कवरच्या कागदांची दशा पहा ना ! कमाल आहे ! शी ऽ ऽ—

**एब :** मीं जर आणखी एक वर्ष वकिली केली तर हे सगळे कागदपत्र ठेवायला मला एखादी वखारच घ्यावी लागेल. अरे पण असं काय ? उभे का तुम्ही ? बसा ना-! स्प्रिंगफील्डला कां येणं केलं ?

**बाउलिंग :** ( बसून ) मिशिगन तलावांत मच्छीमार करायला आलों होतो मी—आजच आलों तिथून—फार त्रास झाला—पण तुझं एकंदरींत कसं काय चाललं आहे ? पैशाच्या दृष्टीनं तुझी पूर्वीचीच स्थिति असली तरी सामाजिक दृष्ट्या तुला चांगला लौकिक मिळाला असल्याचं सांगत होता जॉश

**एब :** या दोन्ही गोष्टी अगदीं खऱ्या.बहुतेक साऱ्या महत्त्वाच्या समारंभांच्या वेळीं नेहमीं निमंत्रण येत असतं मला—निनिअन एडवर्ड्स् आठवतच असेल तुम्हांला ?

**बाउलिंग :** वा: ! म्हणजे काय ?

**एब :** त्याच्या वाड्यावर तर माझा पाहुणचार नेहमींच चालू असतो.त्याचा वाडा केवढा विस्तीर्ण आहे त्याची कल्पनाच करतां येणार नाहीं तुम्हांला. अहो, त्याच्या माजघरांत तर घोड्यांच्या शर्यतीचा कार्यक्रम सुद्धां करतां येईल. त्याची पत्नी केंटकीमधील टॉड कुटुंबांतली आहे. फार बडं आहे तें घराणं—

**जॉश :** रोचेस्टरमध्यें तुझी कोणाशीं भेट झाली तें सांग ना यांना—

**एब :** संघराज्याच्या अध्यक्षांशीं !

**बाउलिंग :** काय, म्हणतोस काय ?

**एब :** ( आपला उजवा हात पुढें करून ) पाहिलात हा हात ?

**बाउलिंग :** दिसतो आहे ना ?

**एब :** मार्टिन व्हॅन ब्यूरेनशीं हस्तांदोलन करण्याचं भाग्य लाभलं आहे याला !

**बाउलिंग :** अध्यक्षांनीं तुला योग्य त्या मानानं वागवलं का पण ?

**एब :** ( पहिल्यानें दाराशीं व मग मेजाशीं येऊन ) वागवलं ना ! ते मला म्हणाले, ' वॉशिंग्टनमध्यें तुमची बरीच कीर्ति आली आहे माझ्या कानांवर ! ' पण मागाहून मला असं समजलं कीं, जो जो अलबत्या-गलबत्या स्थानिक पुढारी त्यांना भेटला त्याला त्याला प्रत्येकाला उद्देशून त्यांनीं असंच म्हटलं ! ( हंसूं लागतो. ) मी भलत्याच लोकांची संगत करीत असतों म्हणून हा बिली हर्न्डन असा अगदीं विटून गेला आहे. आमचा बिली भयंकर जहाल आहे—अबॉलिशनिस्ट पक्षाचा आहे तो. त्याला हें

सगळं बदलून जायला पाहिजे आहे—मूग गिळून स्वस्थ बसणारा आणि घटनेला वेदवाक्य मानणारा मनुष्य पाहिला कीं भडका उडतो त्याचा. जर त्याच्या हातीं सत्ता असती तर सबंध संघराज्याला आग लागली असती आणि आपली सर्वांची जळून राखुडी झाली असती. खरं कीं नाहीं बिली ?

**बिली :** ( चिडून ) खरं आहे लिंकन. इतकंच नव्हे तर तुम्हीहि थोडे जहाल झालां असतां तर तुमच्या देशबांधवांना तुमचा अधिक उपयोग झाला असता असा दावा आहे माझा.

**एब :** पाहिलंत बाउलिंग ? अन्याय आणि जुलूम यांच्याशीं मुकाबला करण्यासाठीं मीसुद्धां रक्तलांछित रिंगणांत उतरून अन्याय व जुलूम या हिंस्र पशूंशीं दोन हात केले पाहिजेत असं म्हणणं आहे याचं.

**बाउलिंग :** मी तुम्हाला मनःपूर्वक धन्यवाद देतों हर्न्डन.

**बिली :** ( उठून ) आभारी आहें मी आपला. ( हॅट उचलून व एबला उद्देशून ) विलकॉक्स केसचे सगळे कागद तयार करून ठेवले आहेत मीं. त्यांची नोंद करण्यासाठीं मी ते कोर्टाच्या कारकुनाकडे घेऊन जातों.

**एब :** ठीक आहे.

**बिली :** ( दाराशीं जाऊन व मागें वळून ) स्कायर ग्रीन, आपण आणि मिस्टर स्पीड हे या जगातील आपले सर्वांत जिव्हाळ्याचे मित्र आहेत असं लिंकन नेहमीं म्हणत असतात. त्यांच्याच देखत मी तुम्हांला अशी विनंती करतों कीं, ज्या भिकारड्या डबक्यांत आज ते बुडूं पहात आहेत त्यांतून तुम्ही त्यांना शक्य तितक्या लौकर बाहेर काढलेलं बरं. जातों मी—
( झटक्यानें निघून जातो. )

**जॉश :** ( तो जातां जातां ) ठीक आहे बिली-( जॉश डेस्कशीं जाऊन त्यावर बसतो.

**बाउलिंग :** मोठा तेजस्वी तरुण दिसतो आहे हा एब. सगळ्या गोष्टींची चांगली समज आहे त्याला.

**एब :** ( बिली गेला त्या बाजूला पाहून ) तो आतां खालीं कारकुनाकडे म्हणून गेला—पण जातांना हॅट घेऊन गेला आहे. याचा सरळ अर्थ असा कीं, तो आपलं काम करायला इथं परत येण्यापूर्वी चेनरी हाऊस सलूनकडे नक्की चक्कर मारून येणार तो !

**एब** : हं ... ! आंतून ज्वाला पेटताहेत त्याच्या- पण त्याच्या तोच विझवतोहि आहे तो. बरं पण न्यू सालेममधील काय आहे हालहवाल ? ( बिली बसला होता त्या टेबलाशीं बसतो. )

**बाउलिंग** : तिकडलं सांगण्यासारखं कांहीं उरलेलंच नाहीं—

**एब** : आपल्या सौभाग्यवतीचं कसं काय आहे ?

**बाउलिंग** : नॅन्सीचं सतत कांहीं तरी काम चालू असतंच. तुझ्या मनांत कसले विचार थैमान घालीत असतील याचीच चिंता नेहमीं लागलेली असते तिला. खरं सांगायचं म्हणजे तुझं इतकं बिनसलं आहे तरी काय, तें काढून आणण्याविषयीं तिनं मला तीनतीनदां बजावून सांगितलं आहे.

**एब** : ( हसून ) माझं कांहींसुद्धां बिनसलेलं नाहीं असं सांगा तुम्ही त्यांना. माझी प्रकृति छान असून मी थोडंफार कर्जेहि फेडूं शकलों असल्याचं कळवा त्यांना--

**बाउलिंग** : पण आम्हांला तुझी कांहींच माहिती कशी लागत नाहीं आणि तूं कां कळवीत नाहींस ?

**एब** : वाटलं तर जॉशला विचारा–कामाखालीं मी किती बेजार झालेला असतों तो—

**बाउलिंग** : कसलं एवढं काम ?

**एब** : निवडणुकीसाठीं उमेदवार म्हणून उभा राहिलों आहें मी–

**जॉश** : ( बिछान्याच्या वरील भिंतीच्या भागावर चिकटविलेलें पत्रक दाखवीत ) याचं नांव पाहिलं नाहीं तुम्ही ? व्हिग पक्षाच्या निर्वाचकांची ही यादी आहे ना ? त्याच्या अगदीं तळाला आहे याचं नांव.

**एब** : होय. जर या निवडणुकींत टिप्पेकॅनो निवडून आला तर निर्वाचक मंडळाचा सदस्य होईन मी.

**बाउलिंग** : निर्वाचक मंडळाचा ? म्हणजे एवढीच लायकी आहे का तुझी ?

**एब**: होय अधिक कांहीं काम करायला वेळ तरी कुठं आहे मला ? सेथ गेल आठवतच असेल तुम्हांला–तो–न्यू सालेमला राहात होता–पश्चिम विभागांत जायचं जायचं म्हणून सारखा ध्यास घेतला होता त्यानं–त्याचं पत्र आलं आहे मला. तो आतां मेरीलँडमध्यें स्थायिक झाला आहे. लग्न

४...

होऊन मुलगाहि झाला आहे त्याला आतां. टेक्सास प्रांत संघराज्यांत सामील करण्यांत येणार म्हणून अतिशय हाय खाल्ली आहे तिकडच्या लोकांनीं.

**बाउलिंग :** आणि त्याला कारणहि तसंच सबळ आहे. कारण याचा सरळ अर्थ असा आहे कीं, गुलामगिरीच्या प्रथेचं हें लोण आतां इकडे कान्साज नि नेब्रास्का आणि तिकडे ओरेगॉन आणि कॅलिफोर्निया इथपर्यंत पोहोंचणार ! म्हणजे यामुळें देशाचीं सगळीं राज्यसूत्रं दक्षिण विभागाच्या हातांत जाणार आणि मग स्वतंत्र संस्थानांतल्या आपल्यासारख्या लोकांची काय हालत होईल ती एक परमेश्वरालाच माहीत !

**जॉश :** छे–असा नुसता विचार मनांत आला तरी कांटा उभा राहातो अंगावर ! यांत प्रत्यक्ष युद्धाचीं बीजं आहेत.

**एब :** ( बिछान्याशीं जाऊन त्याच्यावर ताणून देत ) तसं झालं तर त्याचा दोष सर्वस्वी या फुटीर वृत्तीच्या लोकांकडेच जाईल. याचा परिणाम काय होईल याची त्यांना पुरेपूर जाणीव असूनहि ते आपली चळवळ धूमधडाक्यानें चालवीतच आहेत. शांततेचा बिघाड करण्याच्या गुन्ह्याखालीं त्यांना–त्यांच्यांतल्या झाडून साऱ्यांना तुरुंगांत डांबून टाकलं पाहिजे.

**बाउलिंग :** एब, तूं गुलामगिरीच्या प्रथेच्या विरुद्ध आहेस अशी कल्पना होती माझी. तुझं मत बदललं वाटतं आतां ?

**एब :** नाहीं–गुलामगिरीच्या प्रथेच्या विरुद्धच आहें मी. पण त्यापेक्षांहि मी युद्धाच्या विरुद्ध अधिक आहें; आणि त्याहूनहि अधिक महत्त्वाचं हें आहे कीं, तुम्हां दोघांनाहि काय म्हणायचं आहे तें मीं बरोबर हेरलेलं आहे. ( अतिशय आपुलकीच्या स्वरांत ) बिली हर्न्डनचंच खूळ तुमच्याहि डोक्यांत शिरलं आहे–माझं पुढें काय होईल आणि मी लौकिकाला कसा चढेन याचा ध्यास लागलेला आहे तुम्हांला ! खरं आहे ना ?

**बाउलिंग :** तसं नाहीं रे एब. तुझ्या जीवनक्रमांत लुडबूड करण्याची कल्पनासुद्धां शिवलेली नाहीं माझ्या मनाला—

**जॉश :** आणि माझ्याहि. तुझ्यासंबंधानं आतांपर्यंत आमची निराशाच झालेली आहे असं आम्हांला वाटलंच तरीसुद्धां आम्ही कांहीं त्याचा बभ्रा करणार नाहीं.

**एब** : (हसत हसत खालीं उतरून खिडकीजवळ जातो.) मला जें करावं लागत आहे तेंच तुम्हांलाहि करावं लागेल असं वाटतं आहे मला. याचाच दुसऱ्या भाषेंत अर्थ असा कीं, मी जसा आहें तसाच माझा स्वीकार करायची तुम्ही संवय केली पाहिजे. माझी वृत्ति लढाऊ नाहीं. ब्लॅक हॉक युद्धाच्या वेळीं मला प्रत्यय आला याचा. एखाद्या रेड इंडियनवर गोळी झाडण्याचा प्रसंग माझ्यावर येतो कीं काय अशी मला सारखी धास्ती वाटत होती. सुदैवानं त्या रेड इंडियन्सनाहि अशीच भीति वाटत असल्यामुळें त्यांच्यापैकीं कोणी माझ्यासमोरच आला नाहीं. ज्यांना लढण्याची खुमखुमी आहे असे पुष्कळ लोक मला माहीत आहेत, त्यांना लोकांना ठार करायची हौस वाटते आणि लोकांकडून स्वतः ठार होण्याची पाळी त्यांच्यावर आली तरी त्याचीहि त्यांना भीति वाटत नाहीं. तेव्हां ज्या लढाया करणंच भाग असेल त्यांत त्यांनाच खुशाल मश्गूल होऊं द्या.

**वाउलिंग** : शांततावादी लोकांचाहि त्यांच्या राष्ट्रांना कधीं कधीं उपयोग झालेला आहे.

**एब** : देशकार्यांत पडण्याचा ‘ श्रीगणेशा ’ लिहिण्याच्या वेळीं ते शांततावादी असतील कदाचित् ; पण राजकारणाच्या प्रत्यक्ष धकाधकींत पडल्यानंतर मात्र ते तसे राहिले नसतील. समजा, मी कॉंग्रेसतर्फे उभा राहिलो नि निवडून आलों- ( ताठ बसतो. ) तर परिस्थितीचं जें भीषण चित्र तुम्हीं मघाशीं उभं केलं होतं त्या परिस्थितींत अचूक सांपडेन मी. एक दिवस असा उगवेल कीं जेव्हां मला युद्ध किंवा शांतता यांपैकीं कशाला तरी एकालाच निश्चितपणें पाठिंबा द्यावा लागेल. मग तें युद्ध टेक्सासच्या निमित्तानं मेक्सिकोशीं होवो, ओरेगॉनच्या निमित्तानं इंग्लंडशीं होवो किंवा ओहिओ नदीवरील यादवीच्या रूपानं होवो. कशाला तरी एकाला पाठिंबा दिलाच पाहिजे अशी परिस्थिति प्राप्त झाल्यावर माझी वृत्ति कशी राहील ? अर्थातच मी ‘ उदारमतवादी ’ राहीन. आतां उदारमतवाद म्हणजे तरी काय ? एखाद्या जमिनीच्या तुकड्यासाठीं किंवा एखाद्या नीतितत्त्वासाठीं युद्ध पुकारायला उद्युक्त होणं म्हणजे का उदारमतवाद ? का कांहींहि झालं तरी युद्ध करायचंच नाहीं असा संकल्प करणं म्हणजे उदारमतवाद ? नाहीं—बाबांनो, नाहीं. ज्यांना चार महिन्यांपूर्वी मतदारांनीं

निवडून दिलं त्यांना मीं मत देणं एवढंच काम जिथं मला करावं लागणार तें इलेक्टोरल कॉलेज हेंच ठिकाण मला योग्य आहे.

**बाउलिंग :** ठीक आहे एब. तसा तूं मोठा धूर्त आहेस आणि कदाचित् तूं तसाच राहूंहि शकशील अखेरपर्यंत–( निनिअन एडवर्ड्स् येतो. पूर्वीं-पेक्षां तो अंगानं जरा अधिक प्रशस्त आणि अधिक वैभवसंपन्न झालेला दिसतो. तो बाउलिंगच्या वरच्या बाजूला उभा राहतो. ) तुझ्या सद-सद्विवेकबुद्धीच्या कैचींत तूं सहसा सांपडणार नाहींस.

**एब :** अरे वा ! निनिअन—

**जॉश :** अरे खरंच कीं—

**निनिअन :** बिली हर्न्डन मला चेनरी हाऊसमध्यें भेटला होता--त्यानं सांगितलं मला तुम्ही इथं असल्याचं. ( बाउलिंगकडे लक्ष जाऊन ) स्क्वायर ग्रीन, तुम्ही आलांत–आपण स्प्रिंगफील्डला आल्यावर मला आपलं स्वागत केलंच पाहिजे.

**बाउलिंग :** आभारी आहें एडवर्ड्स्-( हस्तांदोलन करतात. )

**निनिअन :** ( एबकडे वळून ) तुला भोजनाचं निमंत्रण देण्यासाठीं मी मुद्दाम आलों आहें एब. तसंच स्क्वायर, आपणहि वेळांत वेळ काढून आलांत तर आमच्या हिला अतिशय आनंद होईल. जॉश, तूंहि यायचंस–

**जॉश :** मोठ्या आनंदानं—

**निनिअन :** केंटकीहून माझी मेहुणी मिस् मेरी टॉड आमच्याकडे नुकतीच आली आहे. इतर सर्वांबरोबर तुमचाहि परिचय होईल तिच्याशीं अनायानें. मोठी छान आणि रसिक मुलगी आहे ती. फ्रेंच फाडफाड बोलते, कितीतरी कविता पाठ येताहेत तिला, फुलांची तर तिला शास्त्रीय माहितीहि आहे. स्टीव्ह डग्लस वगैरे इतर उपवधू तरुणांनाहि निमंत्रण दिलं आहे मीं–तेव्हां तुम्ही कोणीहि उशीर करतां कामा नये.

**बाउलिंग :** आनंद झाला मला एडवर्ड्स. पण घरीं सांगून नाहीं आलों मी–सौभाग्यवती ताटकळत बसेल माझ्यासाठीं—

**निनिअन :** मग नाइलाजच आहे–तुमच्या भावना समजतात मला. एब, तूं येशील ना वेळेवर ?

**एब :** अशक्य नाहीं—

**निनिअन :** छान-आज तुला अगदीं झकास तरुणी पहायला मिळणार आहे. पण तुला आपलं सुचवून ठेवतों-वरसंशोधन करण्याचा बेत दिसतो आहे तिचा-जो तिला सर्वांत आवडेल त्याची निवड जरील ती. आपलं एकटं राहाण्याचं स्वातंत्र्य गमावण्याची तुझी तयारी असली तर भाग वेगळा, नाहीं तर तूं सावध राहावंस हें बरं !

**एब :** या सावधगिरीच्या सूचनेबद्दल मी तुझा आभारी आहें, निनिअन.

**निनिअन :** मग जातों तर मी—बरं आहे स्कायर. आपण भेटूंच जॉश.

( मध्य व उजवी बाजू यामधून बाहेर जातो. )

**एब :** पाहिलंत बाउलिंग—कसा आहे आमचा आयुष्यक्रम ! रूपयौवन-संपन्न इतकंच नव्हे तर मुत्सद्देगिरीची म्हणून मान्यता पावलेली फ्रेंच भाषाहि बोलूं शकणाऱ्या तरुणीशीं ओळख करून घेण्यासाठीं मला निमंत्रण आलं नाहीं असा एकहि दिवस जात नाहीं.

**बाउलिंग :** फ्रेंच भाषेंत तूं कसं काय प्रणयाराधन करतोस हें पहाण्याची सुवर्णसंधि मला साधतां येत नाहीं याचं मला अतिशय दुःख होतं आहे एब.

**एब :** बाउलिंग—जॉश, हें मी तुम्हांला कांहीं तरी सांगत नाहीं. मी माझी स्वतःची फसवणूक करूं शकत नाहीं तशी तुमचीहि तुमचं माझ्याबद्दल जें मत आहे तेंच माझं स्वतःचंहि माझ्याबद्दल आहे. आपल्यांत फरक आहे तो इतकाच कीं, माझ्या दोषांकडे दुर्लक्ष करुन तुम्ही ते पोटात घालूं शकतां आणि मला मात्र तसं करतां येत नाहीं. ( उभा राहून ) तुम्ही अनेकदां देशांतल्या यादवी युद्धासंबंधानं बोलतां पण माझ्या अंतःकरणांत असलं युद्ध चोवीस तास चाललेलं असतं. दोन्ही बाजू बरोबर आहेत आणि दोन्ही बाजू चुकीच्याहि आहेत—आणि दोन्ही बाजू तुल्यबल आहेत. माझ्या अंतः-करणांतलं हें युद्ध थांबवून कृतनिश्चयानं उभं राहण्याची माझी तीव्र इच्छा आहे, पण बायबलमध्यें म्हटलं आहे ना ? ज्या घरांत भाऊबंदकीचं थैमान सुरूं आहे तें घर उभं राहूं शकत नाहीं—मग मी कसा उभा राहूं शकणार? एक ना एक दिवस माझ्या मेंदूच्या ठिकऱ्या उडणार आणि हा माझा देह कोलमडून पडणार—आणि कोणत्याहि दृष्टीनं विचार केला तरी त्यामुळें जगाची सुटका झाली असंच ठरणार. जाऊं द्या—निघूंच या आपण—( डेस्क-

वरील आपली हॅट घेतो. बाउलिंग व स्पीड उठतात. एब दाराशीं जातो.) नॅन्सी वाट पहात असेल तुमची—तुम्हाला गेलंच पाहिजे लौकर—आणि केंट-कीच्या मिस् मेरी टॉडवर छाप पाडण्याकरितां मला आणि जॉशलाहि गेलं पाहिजे. (सर्व जातात—प्रकाश कमी कमी होऊं लागतो.)

# दृश्य ५ वें

स्प्रिंगफील्डमधील एड्वर्ड्सच्या वाड्यांतील बैठकीची खोली. मागील दृश्यानंतर सहा महिन्यांचा काळ गेलेला असतो. नोव्हेंबर महिन्यांतील सायंकाळ. डाव्या बाजूला शेकोटी, मागील बाजूला पडदा लावलेली भव्य खिडकी, डाव्या बाजूला दिवाणखान्याकडे जाण्याचा दरवाजा. शेकोटीच्या उजवीकडे एक लहानसें कोंच व एक आरामखुर्ची. डाव्या बाजूला एक कोंच व मागील बाजूला एक मेज व कांहीं खुर्च्या. भिंतीवर कुटुंबांतील माणसांच्या तसबिरी लावलेल्या दिसत आहेत. एकंदरीनें हें बऱ्यापैकीं सुखवस्तु घर आहे. निनिअन शेकोटी पुढें उभा राहून आपली पत्नी एलिझाबेथ हिच्याशीं बोलत आहे. एलिझाबेथ दिसण्यांत खानदानी व फाजील रुबाबदारशी असते. तिचं कांहीं तरी तंत्र बिघडलं असावं असं वाटतं.

**एलिझाबेथ :** (डाव्या बाजूच्या कोंचावर बसल्या बसल्या) छे—मला हें खरंच वाटत नाहीं. हें खरं असेल तर माझ्या बहिणीचं डोकं ठिकाणावर नाहीं असंच म्हणावं लागेल.

**निनिअन :** असं तरी कसं म्हणावं ? मेरीची नि एबची ओळख झाल्याला आतां कितीतरी महिने झाले-तिनं त्याची पुरती पारख केलेली असली पाहिजे.

**एलिझाबेथ :** एबमुळं आपली जशी करमणूक होते तशी तिचीहि झाली असेल. पण तिचं लक्ष मात्र वेब, स्टीव्हन डग्लस वगैरे बड्या आणि खान-दानी लोकांकडेच विशेष असतं.

**निनिअन :** पण एबमध्यें विशेष असं तुला जें दिसलेलं नाहीं तें तिला दिसलेलं असणं शक्य नाहीं का ?

**एलिझाबेथ :** हें तुमचं आपलं कांहींतरीच तर्कट ! लिंकनचा मोठ्यांत मोठा सद्गुण म्हणजे तो आपला भाबडेपणा कोणापासूनहि लपवून ठेवूं शकत

नाहीं. तसा बिचारा तो फार भला मनुष्य आहे यांत कांहीं शंका नाहीं. पण एखाद्या खानदानी, महत्त्वाकांक्षी तरुणीचा नवरा होण्याची लायकी—

**निनिअन :** अगदीं बरोबर आहे एलिझाबेथ. मेरी महत्त्वाकांक्षी आहे—फाजील महत्त्वाकांक्षी आहे—आणि म्हणूनच तिनं त्याला पसंत केलं-( एलिझाबेथ त्याच्याकडे रागानें पहाते व हंसू लागते. )

**एलिझाबेथ :** तुम्ही गंमत करतांहां माझी—मी उगाचच भडकावं म्हणून बोलतांहां तुम्ही असं—

**निनिअन :** ( एलिझाबेथजवळ येऊन ) नाहीं एलिझाबेथ—जबर धक्का सहन करण्यासाठीं मी मन तयार करतों आहें तुझं. तुझी कदाचित् अशी कल्पना असेल कीं, मेरीसारखी सुस्वरूप, पुढारलेली, केंटकी बँकेच्या प्रेसिडेंटची कन्यका आपल्याला प्रेयसी म्हणून लाभली म्हणून एब लिंकनला आकाश ठेंगणं झाल्यासारखं वाटत असेल! पण हा भ्रम आहे तुझा—( मेरी टॉड प्रवेश करते. ती बावीस वर्षांची असून कांहींशी ठेंगणी, सुस्वरूप, अतिशय चलाख अशी असते. आल्याबरोबर ती दारांतच थांबते आणि त्या दोघांकडे चौकस दृष्टीनें आळीपाळीनें पहात राहते. निनिअन आतां कोंचावर बसलेला असतो. )

**मेरी :** कसला विषय चालला होता ?

**निनिअन :** ( उठून व मेरीकडे वळून ) आजकाल सगळ्या पोरांच्या तोंडीं झालेलं तें गाणं समजावून सांगत होतों मी तुझ्या बहिणीला—

**मेरी :** ( छद्मीपणानें हंसून ) तुमच्या चलाखीचं मी अभिनंदन करतें निनिअन. पण आतां तुमचं माझ्याबद्दल बोलणं चाललं होतं हें नक्की—( एलिझाबेथकडे पहाते. एलिझाबेथ कचरल्यासारखी दिसते. ) काय—खरं ना ?

**एलिझाबेथ :** ( मेरीजवळ जाऊन ) बरोबर ओळखलंस तूं मेरी.

**मेरी :** आणि चर्चासुद्धां अगदीं गंभीरपणें चालली असेल ?

**निनिअन :** ही उगाचच घाबरून गेली आहे—

**एलिझाबेथ :** ( फणकाऱ्यानें ) मला जें बोलायचं आहे तें स्पष्टच बोलतें मी. ( मेरीच्या उजव्या बाजूला जाऊन ) मेरी, खरं काय असेल तें कळलंच पाहिजे मला. तूं कांहीं विचार केला आहेस का ? अब्राहाम लिंकनशीं

लग्न करण्याचा खरंच का विचार आहे तुझा ? ( मेरीपासून दूर होत ) माझा तरी बाई याच्यावर विश्वास बसत नाहीं—

**मेरी :** पण निनिअननंचि या विषयाला तोंड फोडलं आहे ना ? त्यांनीं या कुवार्तेचा स्फोट नाहीं तरी केलाच आहे. तेव्हां आल्या प्रसंगाला आपण सादर झालंच पाहिजे. मग उगाचच वेळ तरी कशाला फुकट दवडायचा ? मी देतें तुला तुझ्या प्रश्नांचं उत्तर. तूं आतां ज्या विषयासंबंधानं मला विचारलंस त्याचा मीं कांहीं नव्हे-पूर्णपणें विचार केला-आणि लिंकनशीं विवाह करण्याचा माझा ठाम निश्चिय झालेला आहे. ( एका कोंचावर जाऊन बसते. ) आपल्या परिसरांतल्या आणि परिचयाच्या सगळ्या तरुण, आणि कांहीं वयस्कसुद्धां, उमेदवारांच्या गुणावगुणांची परीक्षा मीं केलेली आहे. त्यांत लिंकनचे गुण मला सर्वांत श्रेष्ठ वाटले आणि मीं त्याला पसंत केलं.

**एलिझाबेथ :** ( तिच्याजवळ जाऊन ) या तुझ्या विक्षिप्त निवडीबद्दल मी तुझं अभिनंदन करीन असं वाटतं तुला ?

**मेरी :** छे-छे-मला अभिनंदनहि नको आहे आणि सांत्वनहि नको आहे.

**एलिझाबेथ :** ठीक आहे. जशी तुझी इच्छा-( उजव्या बाजूला जाऊन निनिअन आणि मेरी यांच्याकडे पाठ करून एका खुर्चीवर बसते. )

**निनिअन :** नसत्या चौकशा कशाला म्हणून रागावूं नकोस तूं मेरी. पण तुझा हा संकल्प तूं खुद्द अब्राहमला कळवला आहेस का ?

**मेरी :** ( जरा हसून ) नाहीं अजून. पण आज संध्याकाळीं इथं यायचं कबूल केलं आहे त्यांनीं. मग ते मला विनम्र भाषेंत लग्नाची मागणी घालतील आणि मग शिष्टाचाराला योग्य त्या प्रमाणांत आश्चर्यचकित आणि कावरीबावरी होऊन, मी लाजत लाजत, जड झालेल्या जिभेनें त्यांना होकार देईन.

**एलिझाबेथ :** ( त्यांच्याकडे अर्धवट वळून सहानुभूतीच्या स्वरांत ) आपण मोठा विनोद करतों आहों असं वाटतं आहे तुला. पण माझ्या मनाला तर हें ऐकून भयंकर धक्का बसला आहे. काय बोलावं हेंच समजत नाहींसं झालं आहे मला. पण तुझी वडील बहीण या नात्यानं माझं कर्तव्य मला केलंच पाहिजे. आई तर कधींच सोडून गेली आपल्याला—पण उद्यां बाबा मला विचारतील. मी तुला आग्रहानं सांगतें-विनवून सांगतें—

**मेरी :** ( कांहींशा मृदु स्वरांत ) मी तुला इतकंच सांगतें कीं, मला आग्रहानंहि सांगू नकोस किंवा विनवूनहि सांगू नकोस. माझा निश्चय अगदीं ठाम झालेला आहे.

**निनिअन :** तुझ्या मनोधैर्याची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे मेरी. पण मी तुला असं विचारतों कीं——

**एलिझाबेथ :** मला वाटतं निनिअन, या विषयासंबधानं आम्ही दोघींनींच बोललेलं बरं-( निनिअन उठूं लागतो. मेरी त्याला थांबवते. )

**मेरी :** नाहीं-यांना काय म्हणायचं आहे तें ऐकायचं आहे मला. ( त्याला उद्देशून ) काय विचारायचं आहे तुम्हांला निनिअन ?

**निनिअन :** विचारावं कीं नाहीं हा प्रश्नच आहे--

**मेरी :** खरंच, विचारा ना——

**निनिअन** मी तुला अगोदरच सांगून ठेवतों कीं मला कांहीं वाद घालायचा नाहीं. एबवर माझा कायमचा लोभ आहे-पण मला तुला इतकंच विचारायचं आहे कीं, पति म्हणून त्याची निवड करतांना तूं त्याच्यांत विशेष असं काय पाहिलंस ?

**मेरी :** ( कांहींशीं गोंधळून ) थोडक्यांत पण स्पष्ट शब्दांत मला उत्तर देतां आलं असतं तर बरं झालं असतं-पण तसं उत्तर नाहीं मला सुचत.

**एलिझाबेथ :** ( मेरीजवळ जाऊन ) सुचणारच नाहीं ! तुझा हा निश्चय तूं अगदीं आंधळेपणानं केलेला आहेस. तो करतांना आपल्या भविष्य-काळाचा विचार करण्याचं भान तुला राहिलेलं नाहीं.

**मेरी :** तुझा हा कयास अगदींच चुकला. भरमसाट किंवा आंधळ्या मोहानं मीं हा निश्चय केलेला नाहीं. नुसत्या अंतराळांत विहार करायला शिकलें नाहीं मी अजून ! लिंकन पश्चिम विभागांतला असला तरी तो कांहीं एखादा देखणा, उमदा राजपुत्र नाहीं, हें माहीत आहे मला. तरी सुद्धां उभ्या आयुष्यांत ज्या पुरुषांशीं माझा परिचय झाला त्यांत अब्राहाम हा एकच पुरुष असा आहे कीं, ज्याच्या जीवनांत आणि उत्कर्षापकर्षांत आपण सहभागी व्हावं असं मला प्रकर्षानं वाटलं.

**एलिझाबेथ :** ( उजव्या बाजूला येऊन ) त्याच्याशीं लग्न करून आपल्याला

जन्मांत सुख लागणं शक्य नाहीं एवढंहि कळूं नये तुला ? त्याची पूर्वपीठिका; त्याची चालचलणूक, त्याची एकंदर विचारसरणी... ?

**मेरी :** ( गंभीरपणें ) जगाची जी सुखाची व्याख्या आहे ती माझी व्याख्या नाहीं. ऐषआरामांत लोळणं आणि कसलीहि काळजी करण्याचा प्रसंग न येणं यांच्यासाठीं मी भुकावलेली नाहीं.

**एलिझाबेथ :** ( वळून ) मग त्याच्याशीं लग्न केल्यानंतर जें जीवन तुला कंठावं लागणार त्याच्यासाठीं तूं भुकावलेली आहेस वाटतं ? एक भिकारडी खोली, नाहीं नोकरचाकर, चार लोकांत जाऊन बसायचं म्हटलं तर नाहीं अंगावर धड कपडा—

**मेरी :** (आवाज चढवून) दारिद्र्याचा मीं कांहीं अजून अनुभव घेतलेला नाहीं. तेव्हां त्याला मी कसं काय तोंड देऊं शकेन हें मी आत्तां सांगूं शकत नाहीं. पण आतांपर्यंत मीं जें कांहीं अनुभवलं आहे त्यापेक्षां दारिद्र्य परवडेल मला. मात्र तें भोगीत असतांना, कसलं तरी अफाट साहस करण्याची संधि माझ्या डोळ्यांना दिसत राहिली पाहिजे, पतीच्या हातांत हात घालून मी पुढेंपुढें चाललें आहें—क्षितिजाच्याहि पलीकडे चाललें आहें याची जाणीव मला झाली पाहिजे. ( अखेर अखेरचें भाषण आत्यंतिक आवेगाचें असतें. )

**एलिझाबेथ :** आणि एन्नसारख्या साऱ्या मुलखाच्या आळशी, बेजबाबदार आणि थट्टामस्करी हेंच आपलं जीवनसर्वस्व मानणाऱ्या माणसाच्या हातांत हात घालून हें साधणं शक्य आहें असं वाटतं तुला ?

**मेरी :** ( उठून व रागानें एलिझाबेथजवळ जाऊन ) त्याला चालायला लावण्याचं सामर्थ्य माझ्या अंगांत असेल तर तो स्वस्थ बसून राहणार नाहीं— आणि तसं सामर्थ्य आहे माझ्या अंगांत. माझ्या सुखाची तुझी कल्पना काय आहे ती माहीत आहे मला. तुला ज्या प्रकारचं सुख मिळालं त्याच प्रकारचं सुख मला मिळावं ही तुझी कल्पना आणि म्हणून या निनिअन-सारख्या एखाद्या माणसाची मी पति म्हणून निवड करावी ही तुझी इच्छा ! अगदीं याच्याचसारखे असलेले अनेक लोक माहीत आहेत मला. पण निनिअनसंबंधींचा माझा आदर कायम ठेवूनसुद्धां मी असं निश्चित सांगूं

शकते कीं, मला असला पति नको आहे–मी त्याचा स्वीकार करणार नाहीं– अशक्य आहे तें ! सामान्य माणसाचा आपल्याला विटाळ होऊं नये असं दाखविण्यासाठीं म्हणून आपल्या घरासभोंवतीं कुंपण घालीत असतां तुम्ही– पण खरं म्हणजे त्या कुंपणामुळेंच विशाल जीवन जगण्याचा मार्ग तुमचा तुम्ही रोखून घेत असतां ! अब्राहाम लिंकन हा एकच मनुष्य मला असा दिसतो आहे कीं, ज्यानं इतरांना जरुरी वाटत असलेल्या कुंपणासाठीं तयारी करून दिली आहे, पण स्वतः कुंपणांत राहण्याचा विचार ज्याच्या मनालाहि शिवत नाहीं.

**एलिझाबेथ** : काय बोलते आहेस तूं हें मेरी ? तुझं डोकं ठिकाणावर आहे का ? ( उजव्या भागाकडे जाऊं लागते. )

**मेरी** : ( तिच्या मागोमाग जात तिरस्कारानें ) तुला माझं डोकं फिरलेलं वाटणं साहजिक आहे. जगांत चांगला जम बसलेल्या, श्रीमंतींत लोळणाऱ्या, काळजी हा शब्दहि माहीत नसलेल्या माणसाशीं तूं लग्न केलं आहेस. आपल्या परिस्थितींत बदल घडवून आणण्याचा किंवा ती सुधारण्याचा तूं कधीं प्रयत्नच केलेला नाहींस. ती सुधारूं शकेल असा नुसता विचारहि तुझ्या मनाला कधीं शिवलेला नाहीं. तुझ्या दृष्टीनं तुला जें कांहीं मिळालेलं आहे तें अगदीं पुरेपूर आहे–आणखी कांहीं मिळवायचं असं राहिलेलंच नाहीं. पण मला तसं वाटत नाहीं. माझ्यासाठीं आणि माझ्या पतीसाठीं, जीवनाला मला निराळं वळण लावायचं आहे. याला का तूं बेजबाबदार-पणा म्हणतेस ?

**मोलकरीण** : ( डावीकडील दारांतून ) लिंकनसाहेब आले आहेत बाई-साहेब—

**एलिझाबेथ** : आला एकदाचा—

**मेरी** : आले ? ( डाव्या बाजूच्या खिडकीशीं जाते. )

**मोलकरीण** : आंत यावं—

**एब** : ( प्रवेश करतो. त्याच्या अंगांत नवे कपडे असून त्याचे केस वगैरे बरेचसे ठाकठीक केलेले दिसतात. ) कसं काय—

**निनिअन :** (उठून व जवळ जाऊन) यावं-यावं एब. (वातावरणाचा एकंदर सूर एबच्या ध्यनांत येतो. तो आपल्या मुद्रेवर कसल्याहि प्रकारचा भाव उमटू न देण्याची दक्षता घेतो. मेरी एका कौंचावर बसते.)

**एब :** (पुढें होऊन) मला जरा उशीरच झाला, नाहीं निनिअन? तो न्यू सालेममधल्या मवाल्यांचा दादा जॅक आर्मस्ट्रॉंग-त्याची बायको भेटली होती मला! जॅक आर्मस्ट्रॉंग आठवत असेल तुला निनिअन?

**निनिअन :** (कौंचावर बसतो. हसून) वाः! त्याला कसा विसरेन मी? ते राजश्री धंदा काय करीत असतात हल्लीं?

**एब :** (जरा जवळ येऊन) बरं चाललं आहे हल्लीं त्याचं. पण त्याची बायको हॅना–मोठा बिकट प्रसंग आला आहे बिचारीवर. तिचा मुलगा डफ याच्यावर खुनाचा आरोप आला आहे आणि त्याची केस मीं चालवावी असं म्हणते आहे ती. मीं तुरुंगांत जाऊन तिच्या मुलाची भेट घेतली. मला तरी त्याच्यावर आलेला आरोप खराच असावा असं वाटतं आहे. पण त्याची बिचारी आई माझ्या तुमानींना कातडं लावायची नि मी या पोराला गोट्या खेळायला शिकवायचं–तेव्हांपासूनची आमची ओळख. (एलिझाबेथकडे वळून) मी जंगलाची पहाणी करायला गेल्यावर माझ्या तुमानीच्या चिंध्या होऊं नयेत म्हणून माझ्या तुमानींच्या कडा कातड्याच्या पट्टीनं मजबूत करायची ती. हे सगळे संबंध लक्षांत घेऊन मीं असं ठरवलं कीं त्या मुलाची केस शक्य तितक्या कसोशीनं चालवून न्यायाचा कांटा आपल्याकडे झुकवणं माझं कर्तव्यच आहे!

**निनिअन :** (हसून) मग तो मुलगा सहीसलामत सुटणार! मी खरंच सांगतों तुला एब, जर ही तुम्हां वकिलांची जात नष्ट झाली तर देशांतले सगळे लोक कायद्याचा मान राखून शांततेनें नांदू लागतील. पण (उठून) माफ कर हं. मला नि एलिझाबेथला जरा गेलं पाहिजे. मुलांकडून प्रार्थना म्हणवून घेऊन झोपवलं पाहिजे त्यांना.

**एब :** मग मी पण ऐकेन त्यांची प्रार्थना—

**निनिअन :** नको—नको—तूं आलास म्हणजे तुझी गोष्टींची पोतडी सोडशील आणि त्यांना रात्रभर जागवशील. चल एलिझाबेथ–(तिच्या मनांतून जायचें नसतें. पण काय बोलावें हें तिला सुचत नाहीं.)

**एब :** मीं आलों आहें म्हणून सांग मुलांना– ( एलिझाबेथ उठते.)

**निनिअन :** मुळींच सांगणार नाहीं. नाहींतर इकडे येण्यासाठीं थैमान करून सोडतील ते—

**एलिझाबेथ :** (अखेरचा प्रयत्न करण्याच्या इच्छेनें मेरीजवळ जाऊन) मेरी तूंहि येतेस कां आमच्याबरोबर ?

**निनिअन :** (एलिझाबेथचे खांदे धरून) असं काय एलिझाबेथ ? तिला राहूं दे ना इथंच. तीहि आली तर एबशीं बोलायला कोण ? ( तिला पुढें घालून आपण मागोमाग जातो. )

**मेरी :** ( हंसून ) निनिअननीं तुम्हाला मुलांना भेटूं दिलं नाहीं याबद्दल मी नाहीं त्यांना दोष देणार. त्या सगळ्या मुलांना तुमचा फारच लळा आहे.

**एब :** मुलांचं नि माझं नेहमींच छान जमतं. याचं कारण मला वाटतं एवढंच कीं, माझी आपली त्यांना गंमत वाटते.

**मेरी :** तुम्हीं मनं जाणतां त्यांचीं आणि हेंच खरं आहे त्यांतलं. पण बसा ना, असे उभे कां ?

**एब :** बसतों ना—( शेकोटीजवळील खुर्चीशीं जाऊन मेरीसमोर बसतो. त्याची प्रेक्षकांकडे पाठ झालेली असते. ती त्याच्याकडे आमुसलेल्या नजरेनें पहात राहते. प्रकाश मंद होत जातो. )

## दृश्य ६ वें

तीच एबची कचेरी–नूतन वर्षारंभदिन. दुपारची वेळ. मागील दृश्यानंतर कांहीं आठवड्याचा काळ लोटलेला आहे.

एब विमनस्क स्थितींत खुर्चीवर बसून डेस्ककडे पहात आहे. त्याच्या डोक्यावर हॅट असून गळ्याभोंवतीं मफलर लोंबत आहे. डाव्या बाजूला असलेल्या मेजावर जॉश स्पीड अर्धवट बसलेला आहे. एकाग्र मनानें तो एक लांबलचक पत्र वाचीत आहे. समग्र वाचून झाल्यावर तो त्याची काळजीपूर्वक घडी घालतो व जमिनीकडे पाहूं लागतो.

**एब :** झालं का पत्र वाचून जॉश ?

**जॉश** : झालं--

**एब** : कसं काय वाटलं तें तुला ? बरं वाटलं ?

**जॉश** : नाहीं-बरं नाहीं वाटलं. ( एब वळून त्याच्याकडे पहातो. ) अगदीं सौम्य भाषेंत सांगायचं तर हें पत्र पाठवणं म्हणजे फार भयंकर चूक करण्यासारखं आहे--

**एब** : मीं माझं म्हणणं फारच ओबडधोबड भाषेंत लिहिलं आहे वाटतं ? ( एब फार दुःखी झालेला दिसतो, पण आपलें दुःख लपवून ठेवण्याचा शिकस्तीचा प्रयत्न तो करीत असतो. )

**जॉश** : तुझ्या शब्दयोजनेबद्दल भांडत बसायचं नाहीं मला-खरोखरच नाहीं. तसंच म्हणायचं तर शब्दयोजना अगदीं अचूक झाली आहे. पण त्यांतला ध्वनि ? तो मात्र अगदीं क्रूर, जंगली आहे. तुला शोभत नाहीं तो-तुझ्या लिहिण्यांत असा ध्वनि निर्माण होऊं शकेल असं स्वप्नांत सुद्धां वाटलं नव्हतं मला.

**एब** : जिच्यावर माझं प्रेम असल्याची सर्वांना खात्री वाटत होती तिच्याशींहि मी पूर्वीं असाच वागलों होतों. माझं तें वागणं आवडलं होतं तिला.

**जॉश** : सगळ्याच बायका कांहीं सारख्या नसतात. खिडकीशीं जाऊन पुन्हा एबजवळ येतां येतां ) स्त्रियासुद्धां माणसंच असतात आणि आपणां पुरुषांत जसे निरनिराळे प्रकार असतात तसेच ते स्त्रियांतहि असतात ही वस्तुस्थितीच तुला पटत नाहींशीं दिसते. सगळ्याच स्त्रियांना तूं एका मापानें मोजतोस. स्त्रिया म्हणजे माणसंच नव्हत अशी भावना आहे तुझी. हें पत्र तूं मेरी टॉडला लिहिलेलं नाहींस-स्वतःला लिहिलेलं आहेस. तुझ्या सदसद्विवेकबुद्धीच्या टोंचणीला तूं मलमपट्टी करीत असल्याचं या पत्रांतील प्रत्येक ओळीवरून स्पष्ट दिसतं आहे.

**एब** : ( डाव्या बाजूच्या मेजाच्या डाव्या टोंकाकडे जाऊन किंचित् रागानें ) म्हणजे हें पत्र तूं तिला नेऊन द्यायला तयार नाहींस असंच समजायचं का मीं !

**जॉश** : होय. हें पत्र मी तिला नेऊन देणार नाहीं.

**एब** : ( संतापून ) तूं नाहीं तर दुसरा कोणी तरी देईल.

**जॉश** : ठीक आहे. तुमचं लग्न लावायला आलेल्या पाद्र्याच्या हातांतच दे तें नवऱ्या मुलीला देण्याकरितां. एब, तुझं मन जरा शांत होईपर्यंत तूं हें पत्र पाठवूं नयेस हें बरं—

**एब** : या गोष्टीची पुरी शहानिशा होऊन ती वाटेंतून कायमची बाजूला झाल्याशिवाय माझें मन शांत होणारच कसं? डोळे आहेत ना तुला? माझी अवस्था काय झाली आहे ती दिसत नाहीं तुला?

**जॉश** : मला सगळं कांहीं स्पष्ट दिसतं आहे. तुला स्वतःलाहि कल्पना नाहीं इतकी तुझी स्थिति भयंकर झाली आहे; आणि खरं म्हणशील तर एखाद्या चांगल्या हुशार वैद्याचा तूं सल्ला घ्यावास असं माझं तुला आग्रहाचं सांगणं आहे.

**एब** : वैद्याला बरं करतां येण्यासारखं का माझं दुखणं आहे हें?

**जॉश** : ज्यांची मनःस्थिति तुझ्यासारखीच बिघडली आहे त्यांनासुद्धां उपचार करण्यांत डॉक्टर ड्रेक यांचा हातखंडा आहे म्हणे!

**एब** : ( आत्यंतिक दुःखानें ) म्हणजे तूं अशी माझी परीक्षा केलीस तर? जें मला होईल होईलसं एकसारखं वाटत असे तें शेवटीं झालंच मला! माझं डोकं फिरलं आहे. जॉश, इतर कोणाहीपेक्षां तूं मला अधिक चांगला ओळखतोस—आणि तूं माझी केलेली परीक्षा कांहीं अजिबात चुकलेली नाहीं. मला तर असंच वाटतं आहे कीं, मी कड्यांच्या टोंकाशीं येऊन पोहोंचलों आहे हातांतला आधार सोडून मला उडी घेतलीच पाहिजे. ती उडी कुठें पडेल आणि माझे पाय जमिनीला लागतील कीं नाहीं कोण जाणे! पण मला हें मात्र नक्की माहीत आहे कीं, मीं हातीं धरलेली दोरी मला सोडलीच पाहिजे—ती मला कायमची धरून ठेवून चालणार नाहीं—मला तिच्यापासून दूर झालंच पाहिजे. ( जॉश खिडकीकडे गेलेला असतो. तो एकदम एबकडे वळतो. एबजवळ जाऊन )

**जॉश** : ( बिछान्याच्या डाव्या बाजूकडे जाऊन ) निनिअन एडवर्ड्स् येतो आहे. हें पत्र त्याला दाखवून त्याबद्दल त्याचं मत विचारलं तर?

**एब** : (उद्वेगानें) छे—छे—तें शक्य नाहीं! या पत्रासंबंधानं एक शब्दसुद्धां बोलूं नकोस त्याच्याशीं. खिशांत ठेवून दे तें. त्यासंबंधानं त्याच्याशीं

विचारविनिमय करण्याइतकी माझी मनःस्थिति ठिकाणावर नाहीं. ( जॉश पत्र खिशांत ठेवतो. बिछान्यावर बसून बाहेर पहातो. )

**जॉश :** यावं निनिअन—

**निनिअन :** हं–कसं काय जॉश ? नूतन वर्ष सुखाचं जावो ! ( असें म्हणत म्हणत आंत येतो. त्याचे कपडे झकपक असून त्याच्या हातांत चांदीच्या मुठीच्या दोन काठ्या असतात. ) एब, तुझ्या साऱ्या आयुष्यांत गेलं नसेल इतकं हें नूतन वर्ष तुला सुखाचं जावो ! ( काठ्या टेबलावर ठेवतो.

**एब :** आभारी आहें मी निनिअन. तुझ्याबद्दलहि मी अशीच सदिच्छा व्यक्त करतों.

**निनिअन :** ( ओव्हरकोट काढीत ) तुझ्या आवाजांत कांहीं ही सदिच्छा उमटली नाहीं. ( हातांना ऊब आणण्यासाठीं शेकोटीजवळ जातो. पण आज तुझं असं कांहीं झालं तर तें क्षम्यच आहे. तुझं मनच आज जरा बावरलेलं असणार–( हळूच हंसतो व जॉशकडे पाहून डोळे मिचकावतो. ) अरे पण हें काय ? शेगडी तर अगदीं थंडगार पडली आहे. तुम्ही कधीं पेटवीतच नाहीं कीं काय ती ?

**एब :** सर्पण घातलेलं आहे. पेटव ना तुला हवं असलं तर—

**निनिअन :** ( काडी पेटवून ) आज तुझं बस्तान कांहींतरी बिघडलेलं आहे यांत तर शंकाच नाहीं. ( विस्तव पेटवतो. )

**जॉश :** हवेंतल्या या गारठ्याचा परिणाम झाला आहे त्याच्यावर—

**निनिअन :** असं दिसतं खरं. मला तर तो कुठल्या तरी प्रेतयात्रेहून आल्यासारखंच वाटलं.

**एब :** गेलोंच होतो मी एका प्रेतयात्रेला—

**निनिअन :** ( खोटें वाटून व टेबलाच्या उजव्या बाजूला येऊन ) काय ? प्रेतयात्रेला आणि तुझ्या लग्नाच्या दिवशीं ?

**जॉश :** एबचे जुन्यांत जुने मित्र बाउलिंग ग्रीन वारले ना आज ?

**निनिअन :** ( मनाला धक्का बसून टेबलाच्या उजव्या बाजूवर बसतो. ) अरेरे! फारच वाईट झालं हं ! माफ कर हं मला–! मला माहीत नव्हतं हें. पण

एब, तूं तरी त्यांच्या स्मशानयात्रेला गेला होतास हें बरं झालं. त्यांच्या कुटुंबांतल्या माणसांना त्यामुळं बरं वाटलं असेल.

**एब :** माझ्यामुळें कोणालाच बरं वाटलं नाहीं. मृताविषयीं दोन शब्द बोलायला–त्याचे स्तुतिपाठ गायला–त्यांनीं मला सांगितलं. मींहि तसा प्रयत्न केला, पण मला कांहीं तें जमलं नाहीं. प्राण निघून गेलेल्या कलेवरासारख्या भयाण वस्तूवर लोकांनीं स्तुतिसुमनांचा वर्षाव करावा अशी हे लोक अपेक्षाच कां करतात? बाउलिंग ग्रीनच्या आत्म्याला शांति लाभण्यासाठीं आमच्या शिफारशींची आवश्यकता आहे असं या लोकांना वाटतं कीं काय? मला फक्त इतकंच समजत होतं कीं, बाउलिंग ग्रीन हे एक अतिशय सज्जन आणि सरळ गृहस्थ होते, माझा त्यांच्यावर अतिशय लोभ होता आणि ते इहलोक सोडून गेले.

**निनिअन :** मग हेंच तूं तिथं कां बोलला नाहींस एब?

**एब :** सांगितलं ना तुला? त्यांना मीं व्याख्यान द्यायला हवं होतं.

**निनिअन :** तूं आतां सुखी होणार, मेरीहि सुखी होणार–अशा वेळीं तूं आपले दुःखदायक विचार विसरले पाहिजेस असंच बाउलिंगनीं नक्की म्हटलं असतं. तुमचा विवाह पहायला ते आतां हयात नाहींत याचं मला अतिशय दुःख वाटत आहे. (एबला रंगांत आणण्याचा त्याचा कसून प्रयत्न चाललेला असतो.) रेव्हरंड ड्रेसरला मीं सगळं सांगून ठेवलं आहे, एलिझाबेथनं मेजवानीचा झकास बेत आंखला आहे–तेव्हां तुझ्या या विवाहसमारंभाचा मोठा थाट उडून जाणार यांत शंकाच नको. (बिली हर्न्डन प्रवेश करतो. त्याच्या कोटाच्या खिशांत दारूची बाटली असते. तो थोडीशी पिऊन आलेला असला तरी त्याचें बोलणें स्वच्छ असतें.) कोण–बिली? नूतन वर्ष सुखाचं जावो तुला—

**बिली :** आणि तुम्हांलाहि! (बाटली टेबलावर ठेवून शेकोटीशीं जातो व कोट काढून ठेवून हात शेकूं लागतो.)

**निनिअन :** विवाहाच्या वेळीं तुझ्यासाठीं मीं आहेर आणला आहे एब. नव्या नवरीबरोबर चालतांना आपण जरा रुबाबदार दिसावं असं तुला वाटणं सहजिक आहे अशी कल्पना आहे माझी. (टेबलावरील एक काठी

५...

उचलून एबच्या हातांत देतो. एब गंभीरपणें तिच्याकडे पहात राहातो. )
माझी आणि ही–या दोन्ही काठ्या मीं लुईस व्हिलमधूनच मागवल्या—

**एब** : काठी छान आहे हं निनिअन. आभारी आहें मी तुझा– वळून काठी पुन्हा मेजावर ठेवतो. )

**निनिअन** : आमच्या मेरीला छानछुकी आवडते थोडीशी आणि हेंच लक्षांत घेऊन ही मीं तुझ्यासाठीं आणली हें मी स्पष्टच सांगतों. आतां याच संबंधांत तुला आणखी सांगायचं म्हणजे–जॉश, बिली, माफ करा हं–अगदीं वैयक्तिक नि खासगी बोलावं लागतं आहे मला—

**बिली** : ( वळून तिरसटपणें ) तुमचं तें खाजगी बोलणं माझ्या कानीं पडूं नये अशी तुमची इच्छा असली तर मी इथून—

**निनिअन** : छे–छे–तसं नाहीं रे बिली ! एबच्या इतर मित्रांप्रमाणें मलाहि त्याला दोन शब्द सांगायचे आहेत. ते त्याच्या विवाहापूर्वी सांगायची मला ही शेवटचीच संधि आहे. त्याचं लग्न माझ्या मेहुणीशींच व्हायचं असल्यामुळें त्याचं विहाहोत्तर आयुष्य सुखाचं जावं म्हणून मला विशेषच काळजी घेतली पाहिजे. ( एबकडे वळून ) एब, तूं एक खूणगांठ मनाशीं बांधून ठेव म्हणजे तुझं वैवाहिक जीवन सुखी झालंच म्हणून समज. मेरीच्या महत्वाकांक्षेला तूं लगाम घातला पाहिजेस. माझी पत्नी म्हणत होती कीं, मेरी अगदीं लहान असल्यापासूनच तिला मोठेपणाचीं स्वप्नं पडत असत. त्याच वेळीं ती सर्वांना सांगत असे कीं, ज्या माणसाशीं तिचा विवाह होणार तो या संघराज्याचा अध्यक्ष होणारच ! ( जॉशकडे वळून ) आपण नेहमीं पहातोंच कीं, आपण एक ना एक दिवस संघराज्याचे अध्यक्ष होणार असं अमेरिकेंतल्या सगळ्या मुलांचं स्वप्न असतं आणि त्याच्याशींच आपण विवाह करणार अशा प्रकारचे मनोरे सगळ्याच मुली आपल्या मनाशीं बांधीत असतात. ( एबला उद्देशून ) पण मेरी आतां इतकी मोठी झाली तरी तिच्या डोक्यांतलं तें वेड अजूनहि कायमच आहे. म्हणून सावध राहाण्याबद्दल मी तुला इशारा देऊन ठेवतों आहे. नाहींतर ती तुलासुद्धां वाळूचे किल्ले बांधायचा नाद लावायची ! परमेश्वर तिला जें देतो आहे त्यांत सुख मानायला शिकव तिला. आज तुझ्या विवाहाच्या पूर्वी एवढंच मला सांगा-

यचं आहे. ( कोटाचीं बटनें लावतो. ) तुम्ही सगळ्यांनीं पांच वाजतां यायचं- आणि एबच्या कपड्यांकडे वगैरे लंक्ष असूं द्या तुमचं नीट. ( जातो. )

**बिली :** ( ग्लासांत दारू ओतून तें एबच्या पुढें करीत ) एब, तुम्हांला आणि तुमच्या पत्नीला आरोग्य आणि सुख लाभावं असं मी इच्छितो. ( एब कांहींच बोलत नाहीं. बिली ग्लास रिकामें करून मेजावर ठेवतो. घोगऱ्या स्वरांत ) माझ्या या बोलण्यांत प्रांजळपणा नाहीं असं समजून तुम्ही त्याच्याकडे दुर्लक्ष करीत आहांत. आतां हें मला मान्यच आहे कीं, हा जो उपक्रम तुम्हीं निश्चित केला आहे तो मला मुळींच आवडलेला नाहीं. या विवाहामुळें तुम्ही आपला दर्जा कमी करून घेत आहांत, मोठ्या घराण्याशीं संबंध जुळविण्यासाठीं तुम्ही आपला स्वाभिमान गहाण टाकीत आहांत असं मला प्रामाणिकपणें वाटलं. मला तसं वाटलं म्हणून मी तुमची क्षमा मागतों हवी तर —

**एब :** क्षमा मागण्याची कांहींच आवश्यकता नाहीं, बिली.

**बिली :** मिस् टॉडचं आणि माझं कधीं काळीं पटेल असं मला तरी वाटत नाहीं, पण माझी आतां अशी खात्री होऊन चुकली आहे कीं, आम्हां दोघांचंहि ध्येय एकच आहे. तिच्या मेहुण्यानं आत्तां जी धोक्याची सूचना दिली त्यावरून म्हणतों हो मी असं. ( बिलीच्या स्वरांत निनिअन-विषयीं तुच्छता उमटते. ) जर तुम्ही महात्पदाला चढावं अशी महत्त्वाकांक्षा तिनं बाळगली, त्यासाठीं जर तिनं तुमच्या मागें सतत लकडा लावला, जर ती तुम्हांला सतत टोंचीत राहिली तर परमेश्वराचा वरदहस्त तिला लाभो आणि तिला तसं सामर्थ्य तो देवो असंच मी म्हणेन. ( बिली उरलेली बहुतेक सारी बाटली ग्लासांत ओततो. एब त्याच्याकडे वळून पहातो. )

**एब :** ही सबंध बाटली तूं आजच्या एका दिवसांत संपवलीस ना ?

**बिली :** ही बाटली ना ? होय—संपवली.

**जॉश :** मग त्यांत काय झालं ? आज नूतन वर्षादिन आहे.

**बिली :** बरोबर आहे स्पीड. माझ्या मदतीला बरे धांवून आलात. ( एब-जवळ जाऊन ) संघराज्याचे अध्यक्ष आणि त्यांच्या पत्नी मिसेस् लिंकन यांच्या शुभचिंतनासाठीं—( ग्लास रिकामें करतो- )

**एब :** ( रागानें ) मला वाटतं आतां हें शुभचिंतन पुरे झालं बिली.

**बिली :** ठीक आहे. तुमच्या विवाहापूर्वीचा आत्तां घेतला हा शेवटचाच ग्लास. तुमच्या विवाहानंतर एडवर्ड्स् सर्वांना उंचींतली उंची शँपेन देतीलच. त्या सगळ्या शिष्ट लोकांच्या मेळाव्यांत मी अगदीं कांटेकोर सभ्यपणानं वागेन, अगदीं भिऊं नका तुम्ही एब.

**एब :** विवाहाचा बेत रद्द झाला आहे-( उभा राहून ) मी पत्र देतो तेवढं मिस् टॉडला नेऊन दे.

**बिली :** कसलं पत्र ? काय आहे त्यांत ?

**एब :** जॉश, तुझ्या खिशांतलं तें पत्र दे बरं याला. ( जॉश खिशांतील पत्र काढून शेकोटींत टाकतो व खिडकीशीं जातो. एब उसळी मारतो. ) असं करायचा अधिकार नाहीं तुला-( मध्यावर येतो. बिली डेस्कच्या खालच्या बाजूला येतो. )

**जॉश :** ठाऊक आहे तें मला आणि तरीहि मीं त्या पत्राची वाट लावली आहे. ( एब त्याच्याकडे रोखून पहात असतो. ) माझी मुंडी मुरगळायच्या विचारांत असल्यासारखा बघूं नकोस माझ्याकडे. तसं करणं कांहीं अशक्य नाहीं तुला-पण तसं करणार नाहींस तूं. ( बिलीकडे पाहून ) तुला मीं माझ्या वचनांतून मुक्त केलं आहे असं लिंकननं मिस् टॉडला लिहिलं होतं त्या पत्रांत. आपल प्रेम तिच्यापुढें प्रकट करतांना आपली कांहींतरी चूक झाली आहे आणि म्हणून ज्या विवाहामुळें पति आणि पत्नी या दोघांनाहि जन्मभर दुःख भोगावं लागणार असा विवाह आपण करूं इच्छीत नाहीं असं यानं लिहिलं होतं तिला.

**एब :** ( दुःखातिशयानें ) मग यांत खोटं तें काय लिहिलं होतं मीं ? ( डेस्कवर मान टाकून बसतो. )

**जॉश :** त्यांत कांहीं खोटं आहे असं मीं तरी कुठें म्हटलं आहे ? पण हें सगळं तूं अस्सल मर्दासारखं तिच्या तोंडावर प्रत्यक्षच सागितलं पाहिजेस एवढंच माझं म्हणणं.

**एब :** तसं करणं अधिकच क्रूरपणाचं ठरेल. तशानं तिच्या हृदयाला फारच खोल जखम होईल कारण मी तिला प्रत्यक्षच भेटलो तर ज्या गोष्टी मीं त्या पत्रांत लिहिल्या नव्हत्या त्यासुद्धां तिच्यापुढें ओकून टाकल्याशिवाय मला राहवणार नाहीं. ( एब अगदीं भावनाविवश झालेला आहे. ) तिच्या

राक्षसी महत्त्वाकांक्षेची मला घृणा आहे, माझ्यावर कोणी स्वार होऊन मला वरवर किंवा पुढें पुढें हांकललेलं मला खपत नाहीं, तिच्या चाबकाचे फटके किंवा तिच्या लाथा खाण्याची माझी इच्छा नाहीं–हें सार–सारं मला सांगावं लागेल तिला. आपल्या जीवनांत फार मोठं स्थान प्राप्त करून घेण्याची तिची महत्वाकांक्षा असेल तर तिनं स्टीव्हन डग्लसशी लग्न करावं. हिच्यासारखाच तोहि महत्त्वाकांक्षा बाळगणारा आहे. मला एकांतांत राहणंच मानवतं. ( टेबलाच्या डाव्या टोंकावर बसतो. )

**जॉश :** ठीक आहे–तर मग सांग तिला हें सगळं तिच्या तोंडावर. तिची तुला भीति वाटते असं तूं तिच्यासमक्ष कबूल केलंस तर त्यांत तुझी प्रतिष्ठा तरी दिसेल. पूर्वी तुझा जो उत्साह होता तो आतां मावळला आहे असं सांगून तिची फसवणूक करण्यापेक्षां हें लाखपटींनीं चांगलं. ( बिलीच्या मनांत बराच वेळ बोलायचं असतं. आतां कोणी बोलत नाहींसं पाहून तो संधि साधतो. )

**बिली :** मी थोडं बोलूं का ?

**एब :** युक्तिवाद करण्याच्या परिस्थितींत तूं या वेळीं आहेस कीं नाहींस याचीच मला शंका आहे.

**जॉश :** काय सांगायचं आहे तुला बिली ?

**बिली :** मला एवढंच सांगायचं आहे कीं, लिंकन, तुम्ही मेरी टॉडचा हा त्याग करीत नसून तुम्ही तिची आहुति देत आहांत. तुम्ही तुमच्या महान कर्तव्यांत चुकारपणा करीत असल्यामुळें ज्या पापाचे धनी तुम्हाला व्हावं लागणार, त्या पापाबद्दल, या आहुतीवर संतुष्ट होऊन परमेश्वरानं तुम्हांला क्षमा करावी अशी तुमची इच्छा आहे.

**एब :** महान कर्तव्य–माझं महान् कर्तव्य ! जणूं कांहीं तें आपलं कर्तव्यच आहे असं समजून माझ्या महान कर्तव्याची आठवण करून द्यायला प्रत्येक-जण पुढं सरसावतो, पण तें माझं महान् कर्तव्य काय हें मात्र आजपर्यंत कोणीच मला सांगितलेलं नाहीं.

**बिली :** तर मग मी सांगतों तें. जो जो स्वतःला अमेरिकन म्हणवतो त्या प्रत्येकाचं कर्तव्य काय तें मी सांगतो. स्वयंसिद्ध असलेलीं सत्यं चिरंतन टिकविण्याचा प्रयत्न करणं हेंच तें कर्तव्य. सगळीं माणसं सारखीं आहेत–

त्यांच्यांत उच्चनीच असा भेद नाहीं— ! त्या सर्वांना, कोणालाहि डावलतां येणार नाहींत असे, कांहीं जन्मसिद्ध हक्क आहेत. उदाहरणार्थ, यथार्थानं जीवन जगणं, स्वतंत्र असणं, सुखाचा मार्ग चोखाळणं—

**एब** : आणि या माझ्या हक्कांना मी काय पारखा झालों आहें ?

**बिली** : या देशांतील तुमचे वीस लाख बांधव गुलामगिरींत रखडत पडलेले आहेत याची कायमची टोंचणी तुमच्या मनाला लागून राहिलेली असतांना तुम्हांला या अधिकारांचा उपभोग घेणं कसं शक्य आहे ? आपल्या डेस्कच्या वर असलेला हा आपला राष्ट्रध्वज पहा. ज्या राज्यांचीं प्रतीकं म्हणून यांत दहा तारे घातलेले आहेत त्या राज्यांतील लाक गुलामांना मालमत्तेचे हक्क देण्यापेक्षां संघराज्याचा विनाश झालेला पत्करला असं म्हणतात; अशा या ध्वजाकडे पाहून अभिमान वाटतो तुम्हांला ? तसंच, भविष्यकाळांतील राज्यांची काय वाट ? पश्चिमेकडचीं सगळीं राज्यं—थेट पॅसिफिक महासागरापर्यंत पसरलेलीं सगळीं राज्यं—त्यांत सर्व लोकांना संपूर्ण स्वातंत्र्य राहील काय ? या प्रश्नांचीं उत्तरं तुम्ही आपल्या मनाला कधीं दिलीं आहेत का ? लिंकन, हा ध्वज तुमचा आहे आणि तुम्हांला त्याचा अभिमानहि आहे. पण त्याच्या फाटून चिंध्या होऊं नयेत म्हणून तुम्ही काय केलं आहे ? ( एब उडी मारून बिलीजवळ जातो. )

**एब** : मी माझं काम करतों आहें. समजलास, मी काय करतों आहें तें ? आणि सगळ्यांनीं असंच केलं तर संघराज्याला कधींच धोका पोहोंचणं शक्य नाहीं असा माझा दावा आहे. गुलामगिरीविषयीं म्हणशील तर वाऱ्यावरचीं हीं वक्तव्यं ऐकून मला अगदीं वीट आला आहे. आत्तां तूं मालमत्तेच्या हक्काचा विषय काढलास. तुझं कायद्याचं ज्ञान थोडं जास्त वाढलं म्हणजे मालमत्तेच्या हक्काविषयीं आपल्या घटनेंत हमी देण्यांत आलेली असल्याचं तुला समजून येईल. आणि संघराज्य जर घटनेलाच जुमानीत नसेल तर त्याचा विनाश खुशाल होऊं दे. (डेस्कजवळील खुर्चीशीं जातो.)

**बिली** : ( एबकडे पहाण्यासाठीं वळून ) घटना गेली खड्यांत ! हा जिवंत माणसांच्या स्वातंत्र्याच्या हक्काचा प्रश्न आहे आणि माणसं घटनेच्या पूर्वीं जन्माला आलेलीं आहेत. कायदा जर हा हक्क डावलीत असेल तर तो कायदा चुकीचा आहे आणि तो बदलून घेतलाच पाहिजे. नुसत्या युक्ति-

वादानं हें जमण्यासारखं नसेल तर शक्तीचा अवलंब करूनहि तसं केलं पाहिजे. स्वातंत्र्याच्या संरक्षणासाठीं केलेलं कोणतंहि कर्म पवित्रच आहे. आम्हां सर्वांना हें समजतं आणि तुम्हांला मात्र समजत नाहीं असं म्हणून माझ्या डोळ्यांत धूळ फेकण्याचा प्रयत्न करूं नका. एलायजा लव्हजॉय-सारख्या ज्या माणसांनीं या ध्येयासाठीं आत्मबलिदान केलं त्यांच्याविषयीं तुमच्या मनांत नितांत आदर वसत आहे हें माहीत आहे आम्हाला.

**एब :** ( त्याच्यापासून दूर होत ) होय–त्यांच्याविषयीं माझ्या मनांत अतिशय आदर आहे. ज्या ध्येयांच्या सिद्धीसाठीं आत्मसमर्पणहि करावं इतकीं आपलीं ध्येयं उच्च असल्याबद्दल त्यांची श्रद्धा होती याबद्दल मला हेवाहि वाटतो त्यांचा. ( जॉशकडे वळून थकल्यासारखा ) बरं आहे जॉश, मी स्वतःच जाऊन सांगतों मेरीला... आणि तिला काय तें सांगून झालं कीं, निघून जाईन मी–( जाऊं लागतो. )

**जॉश :** आणि तो कुठं एब ?

**एब :** तें माझं मलाच माहीत नाहीं. ( जातो. बिली त्याच्या मागोमाग त्याला हांका मारीत जाऊं लागतो. )

**बिली :** निघून जाणार तुम्ही लिंकन ? स्वर्गातून परमेश्वर पाहतो आहे–तुम्ही त्याला विसरलां, तुमच्या देशबांधवांचा तुम्हाला विसर पडला, अमर अशा आपल्या आत्म्याकडेहि तुम्ही पाठ फिरवलीत !

**जॉश :** ( दुसऱ्या खिडकीजवळ उभा असलेला ) जाऊं दे बिली–जाऊं दे त्याला–मन ठिकाणावर नाहीं त्याचं.

**बिली :** आपल्याला काय करतां येण्यासारखं आहे-काय करूं शकूं आपण त्याच्यासाठीं ?

**जॉश :** मलाच समजत नाहीं तें बिली. ( खिडकीशीं जाऊन बाहेर पाहूं लागतो. बिली मेजाशीं बसतो. ) त्याच्या मनांत आतां भावनाचं असं कांहीं तुफान उसळलं आहे कीं, बराच काळपर्यंत एकटं–अगदीं एकटं राहावसं त्याला वाटूं लागेल. बिचारी ॲन रतलीज मरण पावली तेव्हां याचं असंच झालं होतं ! आतां हा माळरानं तुडवीत, भकटत, बावरून गेल्या-सारखा चांचपडत–चांचपडत–ज्या जंगलांत त्याचं बालपण गेलं तिथंच

जाणार ! त्याच्यासाठीं आपल्याला कांहींहि करतां येण्यासारखं नाहीं. बिली-त्याचं तोच काय तें करूं जाणे !

**बिली** : ( कळकळीनें ) परमेश्वर त्याला साहाय्य होवो !

## दृश्य ७ वें

एक गवताळ माळ. निरभ्र सायंकाळची वेळ. मागील दृश्यानंतर दोन वर्षांचा अवधि लोटलेला आहे. एक शेकोटी पेटलेली दिसत असून तिच्याभोवतीं बॅगा, ब्लँकेटांच्या घड्या, एक मोडकीतोडकी ट्रंक वगैरे सामान दिसत आहे. शेकोटीजवळ सेथ गेल उभा असून त्याचा आठ वर्षांचा मुलगा जिमी त्यानें उचलून घेतलेला असतो. मुलाच्या अंगाभोवतीं ब्लँकेट लपेटलेलें असतें.

**जिमी** : मला घेऊन शेकोटीजवळ उभे राहूं नका बाबा. माझ्या अंगाची नुसती तलखली होते आहे. माझ्या अंगावरचं हें ब्लँकेटसुद्धां काढून टाका ना—

**सेथ** : नाहीं बाळ. तुझ्या अंगावर पांघरूण असलेलंच बरं.

**जिमी** : मला थोडं पाणी द्या ना बाबा. पाणी प्यालं तर चालेल ना मला?

**सेथ** : चालेल हो ! पण तूं बोलण्याचे श्रम करूं नकोस पाहूं. गोबी गेला आहे तुझ्यासाठीं पाणी आणायला. ( उजव्या बाजूला बघतो त्याला कोणी तरी येतांना दिसतं. ) आलास का जॅक ? मला वाटलं होतं कीं तूं कुठें तरी हरवलास !

**जॅक** : ( प्रवेश करून ) न्यू सालेमच्या परिसरांत मी वाट चुकणं शक्य तरी आहे का ? पण जिमीचं कसं आहे आतां ?

**सेथ** : ( जॅककडे सावधगिरीनें पहात ) त्याला थोडी तहान लागली आहे. बरं पण तुला एब दिसला का कुठें ?

**जॅक** : दिसला ना–पण तो इकडेतिकडे भटकत असल्यामुळें त्याला शोधायला मला जरासा वेळ लागला. शेवटीं नदीपलीकडे असलेल्या ॲन रतलीजच्या थडग्याजवळ सांपडला तो.

**सेथ** : इथं येणार आहे का तो ?

**जॅक :** डॉक्टर शॅंडलरला इथं घेऊन यायचं म्हणत होता तो. हे डॉक्टर विंचेस्टर रोडला राहातात. यावाच तो इतक्यांत-(जिमीजवळ जाऊन) जिमी; लबाडा कसं वाटतं आहे तुला आतां ?

**जिमी :** तहान लागली आहे मला-( ॲग्गी येते. तिची नजर जॅककडे जाते )

**ॲग्गी :** तुम्हांला परत आलेले पाहून अतिशय बरं वाटलं मला आर्मस्ट्रांग.

**जॅक :** डॉक्टरसुद्धां येणार आहेत इथं लौकरच.

**ॲग्गी :** देवाचीच कृपा म्हणायची ! सेथ, या गाडींतच ठेवा ना जिमीला. त्याच्यासाठीं मीं छान अंथरून घालून ठेवलं आहे.

**सेथ :** ऐकलंस जिमी ? तुला आरामांत पडण्यासाठीं आईनं झकास जागा केली आहे. (ॲगी गाडींत जाऊन बसते.)

**जिमी :** गोबी कसा येत नाहीं अजून ? मला कोण तहान लागली आहे ? आणणार कधीं तो पाणी ?

**सेथ :** आतां येईल बाळ. गोबी पाणी आणल्याशिवाय नक्की राहणार नाहीं. (जिमीला गाडींत नेऊन ठेवतो.)

**जॅक :** जिमीचं मान जास्तच बिघडलं आहे, नाहीं ?

**सेथ :** (निराशेच्या स्वरांत) हं-ऽ ! तूं गेल्यापासून त्याचा ताप सारखा वाढतोच आहे एब आला इथं तर कितातरी धीर येईल मला. दुसऱ्यांना धीर वाटण्यासारखं करतोच तो नेहमीं कांहींतरी—

**जॅक :** किती दिवसांत एबची नि तुझी भेट नाहीं, सेथ ?

**सेथ :** सात आठ वर्षांपूर्वीं मी हा प्रांत सोडून गेलों तेव्हांपासून नाहींच. परस्परांची हकीकत पत्रानं काय समजत असेल तेवढीच.

**जॅक :** (शेकोटीच्या मागें उजव्या बाजूला बसून) त्याला आतां बघितल्यावर आश्चर्यच वाटेल तुला. स्प्रिंगफील्डला गेल्यापासून त्याच्यांत कांहींच्या कांहींच बदल झाला आहे चांगला पुढें येत होता पण अलीकडे घसरला तो. त्याचा स्वभावसुद्धां पूर्वींसारखा गमत्या राहिलेला नाहीं.

**सेथ :** त्याला काय करणार ? सगळ्यांच्यांतच बदल होत असतात, नाहीं का ? (गोबीची चाहूल लागून उठतो-व डावीकडे जातो.) ॲगी-( गोबी हा एक निग्रो असतो. पाण्याची बादली हातांत घेऊन तो डावी-

कडून येतो. ॲगी गाडीच्या बाहेर डोकावते.) गोबी आला आहे ग पाणी घेऊन—

**गोबी :** होय बाईसाहेब. हें घ्या–( पाणी तिच्याजवळ देतो. )

**ॲगी :** शाबास गोबे ( पुन्हां गाडीत जाते. )

**गोबी :** जिमीचं कसं आहे आतां साहेब ?

**सेथ :** जवळ जवळ आहे तसंच आहे.

**गोबी :** ( डोकें हालवून ) स्वयंपाकासाठीं आणखी पाणी आणतों मी—( एक भांडें घेऊन डावीकडून जातों. )

**जॅक :** तूं असा या रस्त्यानें किती दिवस चाललेला आहेस, सेथ ?

**सेथ :** ( त्याच्याजवळ जाऊन ) तीन महिने होऊन गेले. पेन्सिलव्हॅनिआकडील डोंगराळ प्रदेशांत तर अगदीं कहर झाला. काय तो भयंकर पाऊस-नद्यानाले दुथडी वहात असायचे ! दोनचारदां तर इकडे येण्याचा बेत रद्द करून पुन्हां मागें परतावंसं वाटूं लागलं होतं मला. ( उजवीकडे पाहतांना ) अरे पण हा एब येता आहे कीं काय ?

**जॅक :** ( उठून व त्या बाजूला पाहून ) नक्की–एबच–तो—

**सेथ :** पहा तरी ! पोषाख तर मोठा प्रतिष्ठित केला आहे यानं ! एब—( एब उजवीकडून येतो. )

**एब :** ( शेकोटीच्या उजव्या बाजूला जाऊन ) कसं काय सेथ ? त्याच्याशीं हस्तांदोलन करीत ) तुझी पुन्हां भेट झाली म्हणून किती आनंद होतो आहे मला म्हणून सांगूं ?

**सेथ :** आणि मलाहि एब—

**एब :** तूं पश्चिम विभागांत जायला निघाला असल्याचं ऐकून मला अतिशय बरं वाटूं लागलं. छोकरा कुठं आहे तुझा ?

**सेथ :** गाडींत निजवला आहे—

**ॲगी :** ( गाडींतून डोकावून ) डॉक्टर का आले ?

**सेथ :** नाहीं ॲगी–डॉक्टर नाहींत हे. ज्याला भेटायचं भेटायचं म्हणून मी एकसारखं म्हणत असें ना ? तोच हा अब्राहम लिंकन–आणि एब, ही माझी सौभाग्यवती मिसेस गेल—

**एब** : (तिच्याजवळ जाऊन) आपली भेट झाली—फार आनंद झाला.

**ॲगी** : मलाहि.

**एब** : डॉक्टर शँडलर घरीं नव्हते. त्यांच्या घरच्या मंडळींनीं असं सांगितलं कीं, मध्यरात्रीच्या सुमारास त्यांना बोगर फार्मवर जायचं आहे. तेव्हां त्यावेळीं तिथं जाऊन मी घेऊन येईन त्यांना.

**सेथ** : तसं केलंस तर फार मोठं मित्रकार्य केलंससं होईल एब.

**ॲगी** : आम्ही तुमचे जन्माचे ऋणी होऊं.

**एब** : तोंपर्यंत मींच बघतों मला कांहीं करतां आलं तर—

**सेथ** : तुला काय करतां येणार ? त्याला शीतज्वरानं पछाडलं आहे. त्यानं स्वस्थ पडून राहावं म्हणून धडपड चालली आहे आमची—

**ॲगी** : ( निराश होऊन ) आतां मला एकाच गोष्टीचा ध्यास लागला आहे. या निर्जन प्रदेशांत एखादा धर्मोपदेशक सांपडण्याची शक्यता आहे का ?

**सेथ** : ( घाबरून ) धर्मोपदेशक ?

**एब** : तुला आहे कोणी माहीत, जॅक ?

**जॅक** : नाहा बुवा. न्यू सालेमपासून वीस मैलांच्या परिसरांत एकहि धर्मोपदेशक नाहीं.

**ॲगी** : असता तर जिमीसाठीं प्रार्थना करायला आपण त्याला तरी आणलं असतं—( पुन्हां गाडींत जाऊन बसते. सेथ गाडीजवळ जाऊन तिच्याकडे घाबरल्यासारखा बघत राहतो. )

**सेथ** : ज्याअर्थी हिला यावेळीं धर्मोपदेशक आठवला त्याअर्थी हिनं आतां जिमीची आशाच सोडलेली दिसते, नाहीं का ?

**जॅक** : असंच नाहीं कांहीं. धर्मोपदेशक मिळाला असता तर तिच्या मनाला तेवढच बरं वाटलं असतं.

**एब** ! इतका का तुझा मुलगा आजारी आहे ?

**जॅक** : तूच कां नाहीं प्रार्थना म्हणत एब ? कुठल्याहि प्रसंगीं योग्य तें बोलायला तुला चांगलं येतं

**एब** : प्रार्थना नीटशी म्हणतां येत नाहीं मला. ज्याचा ख़रोखर कांहींतरी उपयोग होऊं शकेल असं मला कांहीं सुचतच नाहीं बोलायला.

**सेथ** : त्याला कांहीं हरकत नाहीं रे, अॅगीचा आपला भोळा भाव आहे हा. बस ना एब—

**एब** : शेवटीं तुझं स्वप्न साकार झालं तर सेथ ? आपण पूर्वी जें बोलत असूं तें तूं प्रत्यक्ष करतो आहेस आतां—प्रयाण सुरू आहे—

**सेथ** : होय एब. मेरीलँड सोडून बाहेर पडावंच लागलं आम्हांला. अगदीं खुद्द आमच्या शेतावरच भरमसाट वस्ती वाढली. तेव्हां जिथं अधिक मोकळेपणानं राहायला मिळेल असं ठिकाण शोधतों आहोंत आम्ही. आम्ही तिथून निघत असल्याचें चार महिन्यापूर्वीच कळवलं होतं मीं तुला. मला इथं तुझी भेट घ्यायची आहे असंहि कळवलं होतं. आमच्या या पर्यटनांत तूंहि आम्हांला येऊन मिळणं शक्य आहे असं वाटत होतं मला.

**एब** : तुझं तें पत्र मला फार उशिरान मिळालं. मी राहात असें ना त्या इंडिआना आणि केंटकीभोंवतींच भटकत राहिलों होतों मी. आतां नेब्रास्काला स्थायिक व्हायचा बेत आहे कीं काय तुझा ?

**सेथ** : नाहीं—नाहीं—तिथं नाहीं मला राहायचं. आम्ही ओरेगॉनला चाललों आहोंत.

**एब** : ओरेगॉन ?

**सेथ** : होय ना ! सध्यां सगळे लोक तिकडेच जात आहेत.

**सेथ** : पहिल्यानं आम्ही सरहद्दीवरच्या कान्साजमधील वेस्टपोर्ट लँडिंगला जाणार. तिथून पश्चिम विभागांत जाणाऱ्या गाड्या सुटत असतात. आमच्यासारखे कितीतरी लोक जमलेले असतात तिथं. कुरणं नि पर्वत ओलांडतांना अनायासेंच सोबत मिळते.

**एब** : तुम्हांला केवढं अफाट अंतर काटायचं आहे म्हणजे ? नुसत्या कल्पनेनंसुद्धां धसका बसतो मनाला; आणि तुम्ही आपल्याबरोबर सगळी सरहद्दच घेऊन जाणार म्हणायचे !

**सेथ** : हें आमचं करणं कदाचित् अविचाराचं वाटेल, पण तिकडील काळ्या जमिनीची आम्हीं खूपच तारीफ ऐकली—पाऊस आणि ऊन—जेव्हां जें हवं तें तिथं असतं म्हणे !

**जॅक** : तूं पण यांच्याबरोबर कां जात नाहींस एब ? पश्चिम विभागांतल्या प्रांतांत भरमसाट वस्ती वाढते आहे. गेल्याच आठवड्यांत मी इकडून

दोनशें गाड्या जातांना पाहिल्यां. पेन्सिलव्हॅनिआ, कनेक्टिकट, व्हरमॉट, सगळीकडचे लोक होते त्यांत. आपल्याला जमिनी मिळणार म्हणून नुसता जल्लोष चालला होता त्यांचा. अगदीं शपथ घेऊन सांगतों कीं, मीसुद्धां गाडीची सोय झाल्याबरोबर तिकडे जाणार आहें. रेड इंडियन लोकांशीं दोन हात करण्यासाठीं माझ्यासारख्या माणसांची तिकडे गरज भासणारच आणि तशीच तुझ्यासारख्या हुषार माणसांचीहि. एब, तूं तिकडच्या लोकांना शांतिवादाचे पाठ चांगले देऊं शकशील.

**एब**:मलासुद्धां तिकडे येण्याचा मोह होतो आहे. उगाच खोटं कशाला बोलूं?

**जॅक** : मग तुला कोण अडवूं शकणार आहे ? तूंसुद्धां सध्यां नाहीं तरी भटकंतीच करतो आहेस ना ?

**एब** : खूपच भटकंती केली आहे मीं आणि मला कोणी अडवूं शकणार नाहीं हेंहि खरं आहे. सेथ, तुम्ही तिघंच आहांत ना ?

**सेथ** : हो तिघंच—आणि चौथा गोबी–नीग्रो.

**एब** : म्हणजे तुझा गुलाम वाटतं ?

**सेथ** : माझा गुलाम ? छे–छे–( एबकडे वळून ) तो अगदीं पूर्णपणें स्वतंत्र आहे. माझ्या वडिलांनीं त्याच्या बापाला वीस वर्षांपूर्वींच गुलामगिरींतून मुक्त केलं होतं. ( एबजवळ जाऊन ) आम्हांला गोबीची फार काळजी घ्यावी लागते. आमचं मूळ ठिकाण माहीतच आहे तुला तिथल्या लोकांचीं गुलामगिरीसंबंधानं कांहीं विक्षिप्तच मतं आहेत. गुलामगिरींतून मुक्त करण्यात आलेले चागले चांगले नीग्रो ते पकडतात आणि त्यांना गुलाम म्हणून केव्हां फुंकून टाकतात याचा पत्तासुद्धां लागत नाहीं. बरं, कोर्टांत जाऊन त्या बिचाऱ्या नीग्रोंचा फैसला करून घ्यावा म्हटलं तर हे हलकट मात्रागमनी वकील लोक आम्हाला जिथं तिथं नाडतात; आणि म्हणूनच आम्ही शक्य तो गुलामगिरी नसलेल्या राज्यांमधून प्रवास करींत आहोंत.

**एब** : ( सेथला ) ओरेगॉनला सर्वांना स्वातंत्र्य चाखतां येईल अशी का तुझी कल्पना आहे ?

**सेथ** : अर्थात्. मला त्याबद्दल मुळींच शंका वाटत नाहीं.

**एब :** भ्रम आहे हा तुझा, सेथ. वॉशिंग्टनमधले राजकारणपटु मुत्सद्दी जोंपर्यंत पश्चिम विभागांतल्या जमिनी गुलामांच्या व्यापाऱ्यांना विकीत आहेत तोपर्यंत असं होणं शक्य नाहीं.

**सेथ :** ( आवेशानें ) त्या प्रांतांत सर्वांना स्वातंत्र्य मिळालंच पाहिजे. आपल्या नागरिकांना गुलामगिरीच्या शृंखलांतून मुक्त करण्याची जर त्या प्रांताला हिंमत नसेल तर आम्ही ते प्रांत सोडून कॅनडांत जाऊं; किंवा त्याहीपेक्षां म्हणजे पश्चिमेकडे अगदीं दूर जाऊन तिथं एक नवा प्रांत वसवूं.

**एब :** नवा प्रांत ?

**सेथ :** अर्थात्—

**एब :** मेंटर ग्रॅहॅम माझ्याशीं एकदां असं म्हणाले होते, कीं एक ना एक दिवस युरोपांतल्याप्रमाणें या संघराज्याचेहि तुकडे तुकडे उडतील आणि त्याच्चीं आपापसांत भांडणं सुरू होतील.

**सेथ :** बेहेत्तर आहे. माझा देश मला प्यारा आहे आणि त्याच्यासाठीं मी लढणारच लढणार. जॉर्ज वॉशिंग्टन आणि त्याच्यासारखे इतर देशभक्त इंग्लंडवर प्रेम करीत होते आणि आपल्या तारुण्यांत ते इंग्लंडसाठीं लढलेहि-पण जेव्हां त्यांच्या सरकारनें त्यांच्याशीं प्रतारणा केली तेव्हां त्याच्याशीं असलेले आपले संबंध तोडून टाकायला ते यत्किंचितहि कचरले नाहींत.

**जॅक :** मी प्रतिज्ञेवर सांगतों कीं, हा अँडी जॅकसन जर संघराज्याचा अध्यक्ष म्हणून निवडून आला तर त्याच्या चाबकाखालीं या सगळ्या देशद्रोह्यांच्या पाठींचीं धिरडीं होतील.

**एब :** ( तीव्रतेनें ) सेथ, तूं, तुझी पत्नी आणि तुझा मुलगा यांना जर आम्ही अंतरलों तर तो आम्हां अमेरिकनांचा दुर्दिनच ठरेल

**सेथ :** माझा मुलगा ! खरंच, मी मोठ्या मोठ्या गप्पा मारतों आहें पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं. आमचा मुलगा आम्हांला सोडून गेला तर आमचे पायच मोडल्यासारखे होतील आणि आम्हांला चार कदमसुद्धां पुढें जाणं अशक्य होऊन बसेल. भविष्यकाळासाटीं कष्ट केव्हां करायचे ? आपण केलेल्या कष्टांचीं फळं चाखायला त्या काळीं आपला म्हणून कोणीतरी असेल अशी आशा बाळगायला जागा असेल तेव्हां ! माफ कर मला एब—पण मी अगदीं भांबावून गेलों आहें.

**एब :** ( एकदम उठून ) असा भांबावतोस काय, सेथ? मी स्वतःच नेहमीं भांबावून जात असल्यामुळें तुला असं सांगायचा मला अधिकार नाहीं हें माहीत आहे मला. आता तूं जें बोललास, जें महत्कार्य करायचं तूं ठरवलं आहेस तें लक्षांत घेतलं म्हणजे मी खरोखर किती क्षुद्र आहें असा विचार मनांत येऊन लाज वाटायला लागते मला. तूं आणि तुझ्या वृत्तीचीं माणसं या संघराज्यांतच राहूं शकतील अशासाठीं मला कांहींतरी केलंच पाहिजे अशी जाणीव होऊं लागली आहे मला. तूं निराश होऊं नकोस, सेथ. कोणालाहि दबूं नको—अशीच जिद्द बाळग.

**ॲगी :** ( गाडींतून बाहेर येते. सेथजवळ धांवत जाऊन ) सेथ—

**सेथ :** काय झालं ॲगी?

**ॲगी :** जिमी पहा कसं करु लागला आहे तो. झोंपेंत सारखा कण्हतो आहे—त्याला धडपणें श्वाससुद्धां घेतां येत नाहीं—( हताश होऊन बसते. )

**सेथ :** ( तिला सांवरण्याचा प्रयत्न करीत ) भिऊं नको, ॲगी भिऊं नको डॉक्टर आले कीं ते त्याला तेव्हांच बरा करतील. बरा होईल हो आपला जिमी—

**एब :** मिसेस गेल, तुम्हांला योग्य वाटत असेल, तर मी प्रार्थना म्हणण्याचा प्रयत्न करूं का?

**जॅक :** ( एबजवळ येऊन ) आतां कसं सोईचं बोललास?

**सेथ :** एब खरोखर अतिशय उपकार होतील तुझे.

**एब :** ( हॅट काढून ठेवून प्रार्थना म्हणूं लागणार इतक्यांत गोबी डाव्या बाजूनें प्रवेश करतो. ) परमेश्वरा, तूं सर्वांचा पिता आहेस. या बंद गाडींत हा लहान बालक आजारी होऊन पडला आहे, त्याच्यावर तूं आपल्या दयेची पांखर घाल. त्याचे आईबाप नवें घर मिळविण्यासाठीं फार दूरच्या प्रवासाला निघाले आहेत. परमेश्वरा, तुझ्या सगळ्या लेकरांना सुखानें नांदतां येईल अशा प्रकारचा हा मृत्यूलोक व्हावा याकरितां त्यांचे प्रयत्न सुरू असल्यानें ते तुझंच कार्य करीत आहेत. आपण कुठें जात आहोंत हें त्यांना स्पष्ट दिसत आहे आणि मार्गातील अनंत संकटांना बेगुमानपणें तोंड देण्याची त्यांची तयारी आहे- माझी तुला अशी नम्र प्रार्थना आहे कीं, त्यांच्यापासून त्यांचं हें बालक तूं हिरावून घेऊं नकोस. त्याला जीवनाचं

स्वातंत्र्य दे—मृत्यूच्या तुरुंगवासाची शिक्षा त्याला देऊं नकोस. त्याचा जन्मसिद्ध हक्क तूं त्याच्यापासून हिरावून घेऊं नकोस. विस्तीर्ण माळ, गगनचुंबित पर्वत, हिरव्यागार दऱ्या यांचं दर्शन त्याला घडूं दे—कारण तो अमेरिकन आहे. या सर्व गोष्टी त्याच्या मालकीच्या आहेत आणि तो त्यांच्या मालकीचा आहे. त्याचे पूर्वज ज्या ध्येयासाठीं इतक्या प्रामाणिकपणें आणि इतकीं वर्षं खपले तें ध्येय गांठण्याचा त्यालाहि प्रयत्न करतां येणं शक्य व्हावं म्हणून त्याला आयुष्य दे. त्याचं रक्षण कर; त्याला त्याच्या पित्याचं सामर्थ्य दे. परमेश्वरा आम्हां सर्वांनाच सामर्थ्य दे—अशासाठीं कीं, आमचं ध्येय साधण्याचा आम्हांला प्रयत्न करतां यावा. तुझा पुत्र येशू ख्रिस्त याच्या नांवानें तुझ्या कृपेसाठीं मी तुला आळवतो आहें. तुझा तो पुत्र मानवांना स्वतंत्र करण्यासाठींच क्रुसावर चढून प्राणार्पण करता झाला ना? आमेन.

**गोबी :** ( भक्तिभावानें ) आमेन.

**सेथ व ॲगी :** ( हळूहळू ) आमेन. ( एब आपली हॅट डोक्यावर घालतो. )

**एब :** मध्यरात्रीचा सुमार झालाच. डॉक्टरना आणायला जातो हं मी-(जातो)

**सेथ :** ( तो जातां जातां ) आभार आहेत तुझे एब—

**ॲगी :** फार आभार आहेत तुमचे लिंकन—

**गोबी :** परमेश्वर तुम्हांला सुखी करो लिंकन!

( प्रकाश एकदम कमी होतो. )

# दृश्य ८ वें

पडदा सावकाश उघडतो मागच्या दृश्यानंतर थोड्याच दिवसांनंतरचें. एडवर्ड्‌स्‌च्या वाड्यातील पूर्वींचीच बैठकीची खोली. मेरी उजव्या बाजूला एक पुस्तक वाचीत बसली आहे. रात्रींची वेळ थोड्या वेळानें डाव्या बाजूच्या मागून मोलकरीण प्रवेश करते.

**मोलकरीन :** ताईसाहेब, लिंकन आले आहेत.

**मेरी :** लिंकन? ( आपल्या भावना आवरण्याचा प्रयत्न करीत ती कांहीं वेळ स्तब्ध राहाते. नंतर ती पटकन् पुस्तक बंद करून उठते आणि डाव्या बाजूच्या कोंपऱ्यांत जाऊन उभी राहाते. )

**मोलकरीण** : तुम्ही भेटणार त्यांना, बाई ?

**मेरी** : होय. पण एक मिनिट थांब ( मोलकरीण जाते. मेरी विचारमग्न-होऊन पुस्तक कोचावर टाकते. मग वळून पुन्हा उजवीकडे जाते. शेकोटी जवळ थांबते आणि एब्र आंत येत असतांना त्याच्याकडे वळून पहाते. तो तिच्याजवळ येतो–ती त्याच्या बाजूला जाऊं लागते. ) तुम्ही आलांत याचा मला अतिशय आनंद झाला.

**एब्र** : आभारी आहें मी मेरी. मी अशा लाचारीनं पुन्हां इथं का आलों याचं आश्चर्य वाटत असेल तुला.

**मेरी** : निनिअनच्या घराचं दार तुम्हांला नेहमीं उघडंच नाहीं का ?

**एब्र** : आपल्या मागच्या अखेरच्या भेटीच्या वेळीं मी ज्या पद्धतीनें वागलों त्यामुळें माझी मलाच खंत वाटूं लागली आहे.

**मेरी** : तुम्ही भयंकर आजारी पडलां होतां म्हणे एब्र ? जॉशुआ स्पीडनं सांगितलं आम्हांला तसं. काय घाबरून गेलों होतों आम्ही !

**एब्र** : हा तुमचा चांगुलपणा झाला.

**मेरी** : पण आतां सुधारलेली दिसते आहे तुमची प्रकृति. आतां तुम्हांला पुन्हां कामाला लागता येईल. आतां असेंब्लीसाठीं पुन्हां उभे राहणार असाल–का त्याहून एखादा मोठा बेत आहे ?

**एब्र** : माझा कसलाच बेत नाहीं मेरी–( वरमल्यासारखा होऊन ) ज्या दिवशीं आपला विवाह होण्याचं मुक्रर झालं होतं त्या दिवशीं मी जें कांहीं बोललों त्याबद्दल मला अत्यंत वाईट वाटत आहे आणि हेंच तुला सांगण्या-साठीं मी आलों आहें.

**मेरी** : तो विषय कशाला उकरून काढतां एब्र ? त्या वेळीं जें कांहीं घडलं त्याबद्दल मीच दोषी आहें.

**एब्र** : ( शरमिंधा होऊन ) तूं दोषी ? छे–छे–मुळींच नाहीं–तो माझाच नादानपणा होता.

**मेरी** : माझ्या आत्मविश्वासानं आंधळं केलं होतं मला ! माझं–माझं प्रेम होतं तुमच्यावर. ( थोडा वेळ ती चाचरल्यासारखं करते. पण थोड्याच वेळांत ती पूर्ववत् होते. ) तुम्हांलाहि मी माझ्यावर प्रेम करायला लावीन

६...

अशी खात्री वाटत होती मला. आपलं दोघांतलं चैतन्य एकजीव होईल आणि माझा निश्चयी बाणा तुमच्यांतहि निर्माण होईल अशी आशा वाटत होती मला. तुम्ही यथार्थानें मर्द बनाल आणि लोकनायक व्हाल असं वाटत होतं मला ! पण तुम्हांला तशी इच्छा नव्हती. ( वळून डाव्या बाजूला जाते. ) तुमच्यांत सामर्थ्य आहे हें माहीत होतं मला पण आपल्या थोर दैवाशीं दोन हात करण्यासाठींच तुम्ही त्या सामर्थ्याचा—सर्व सामर्थ्याचा उफराटा उपयोग कराल. असें मात्र मला वाटलें नव्हतें.

**एब :** खरं आहे मेरी. माझी तितकी लायकी नसतांनाहि तूं एका काळीं माझ्यावर विश्वास टाकला होतास. पण त्या तुझ्या विश्वासाला पात्र होण्याचा मीं प्रयत्न केला पाहिजे असं मला आतां वाटूं लागलं आहे. ( मेरी त्याच्याकडे चमकून बघते. ) आपले मार्ग सर्वथैव भिन्न आहेत आणि ते जन्मभर तसेच राहाणार अशी ठाम कल्पना करून घेऊन त्या वेळीं मी तुझ्याशीं लज्जास्पद रीतीनें वागलों. ती माझी कल्पना साफ चुकीची होती अशी माझी आतां खात्री होऊन चुकली आहे. आपलं दैव—मग सुदैव असो कीं दुर्दैव असो—एकत्र ग्रथित झालेलं आहे असं आतां मला प्रांजळ-पणें वाटूं लागलं आहे -आणि म्हणून मी तुझ्याशीं पुन्हां लग्नाची मागणी करायला आलों आहें. मेरी, माझी ही मागणी मान्य करणं म्हणजे तुझी तूंच मानखंडना करून घेण्यासारखं आहे याची मला पूर्ण जाणीव आहे.

**मेरी :** मानखंडनेची मला भीति वाटत नाहीं—मात्र अखेरीस विजय मिळून त्या मानखंडनेचं लांछन धुवून निघेल अशी माझी खात्री झाली पाहिजे. पण तुम्हींच तशी जिद्द बाळगली नाहींत तर विजयाची प्राप्ति व्हावी कशी ? बरं, पण तुमच्या एकंदर वृत्तींत एवढा बदल तरी कसा झाला ?

**एब :** माळांमागून माळ पालथे घालीत असतांना माझा बारा वर्षांचा एक मित्र भेटला मला नुकताच. एका बंद गाडींतून तो, त्याची बायको नि त्याचा मुलगा पश्चिम विभागांतल्या प्रांतांत जायला निघाले होते. तो मला आपल्याबरोबर चलण्याचा आग्रह करीत होता—मलाहि मोह पडला होता तसा. पण मग माझ्या लक्षांत आलं कीं, तो मार्ग माझ्यासाठीं नाहीं. ज्या मार्गानं मीं जावं अशी तुझी इच्छा आहे तोच माझा खरा मार्ग आहे आणि त्या मार्गानंच मला गेलं पाहिजे.

**मेरी :** त्या मार्गानं चालतांना तुम्ही लटपटणार नाहीं, मागं वळणार नाहीं किंवा पळून जाणार नाहीं असं तुम्ही मला वचन देतां का?

**एब :** होय. मेरी, जर तूं माझी मागणी मान्य करायला तयार असशील तर मी तुला तसं वचन देतों. योग्य काय तें जाणण्याचं सामर्थ्य परमेश्वरानं मला दिलेलं आहे—आणि योग्य असेल तेंच करण्याच्या प्रयत्नांत मी माझं उर्वरित आयुष्य व्यतीत करणार आहें.

**मेरी :** मग तुमची मागणी मान्य आहे मला. मृत्यु आपली ताटातूट करीपर्यंत मी तुमच्या खांद्याला खांदा लावून झगडेन—( हें बोलत असतांना तिच्या स्वरांत एक प्रकारचं तेज निर्माण झालेलं असतं. त्याच्याजवळ जाऊन ) एब, माझं तुझ्यावर प्रेम आहे—खरंच, अतिशय प्रेम आहे. आपल्या भवितव्यांत कांहींहि लिहिलेलं असो, मरेपर्यंत मी तुझ्यावर प्रेमच करीन. ( त्याच्या खांद्यावर मान टाकून ती हुंदके देऊं लागते. तो तिला सैलपणें आलिंगन दिल्यासारखें करतो. तिच्या खांद्यांच्या वरून तो जमिनीकडे एकटक पाहूं लागतो. )

# ३

♠

## दृश्य ९ वें

इलिनॉईझ प्रांतांतील एक शहर. व्यासपीठ मांडलेलें आहे. १८५८ सालच्या उन्हाळ्यांतील एक सायंकाळ. व्यासपीठावर वक्त्याच्या चेहऱ्यावर समोरून उजेड पडेल अशी प्रकाशाची व्यवस्था करण्यांत आलेली आहे. व्यासपीठावर मागील बाजूला तीन खुर्च्या ठेवलेल्या आहेत. उजव्या बाजूच्या खुर्चीवर न्यायमूर्ति स्टीव्हन ए. डग्लस, डाव्या बाजूच्या खुर्चीवर हॅट घालून एब बसलेला असून अधून-मधून ढोपरावरील कागदावर कांहीं टांचणं करीत आहे. मधली खुर्ची अध्यक्ष या नात्यानें निनिअनची असते. आतां निनिअन भाषण करण्यासाठीं उभा राहिलेला आहे.

**निनिअन :** युनायटेड स्टेट्स् सिनेटरच्या उच्च जागेसाठीं उभे असलेल्या न्यायमूर्ति स्टीव्हन डग्लस व अब्राहाम लिंकन या दोघां उमेदवारांचीं भाषणं आतां आपण ऐकलेलीं आहेत. इलिनॉईझ प्रांतांतले हे दोन प्रतिष्ठित नागरिक आपल्या मतप्रणालींची व मुद्यांची अशा रीतीनें जाहीर चर्चा करीत आहेत, आणि या चर्चामुळें अखिल संघराज्याचं लक्ष या प्रांतावर केंद्रित झालेलं आहे. अमेरिकनांच्या जीवनावर ज्यामुळें अत्यंत गंभीर परिणाम होतील अशा या मतप्रणाली असून त्यामुळें आपल्या प्रिय मातृ-भूमीचं भवितव्य ठरणार आहे. जाहीर चर्चेच्या प्रसंगींच्या पद्धतीप्रमाणें आतां हे दोघे वक्ते परस्परांच्या मुद्यांचं खंडन करतील...न्यायमूर्ति डग्लस—

(असें म्हणून निनिअन आपल्या अध्यक्षीय खुर्चीवर बसतो. डग्लस आपल्या खुर्चीवरून उठून पुढें येतो. तो कांहींसा ठेंगू असतो पण त्याच्या चेहऱ्यांत एक प्रकारची जादू असते. आपल्या सामर्थ्याबद्दल त्याला आत्म-विश्वास असतो. आपलीं टिपणें तो टेबलावर ठेवतो. कांहीं क्षण स्तब्ध उभा राहतो. नंतर—)

**डग्लस :** मद्देशबांधवहो, माझे सन्मित्र लिंकन यांनीं आतां आपल्यापुढें आपल्या नेहमींच्या पद्धतीनें भाषण केलं. त्यांच्या भाषणांत कपट नव्हतं, तें अतिशय प्रामाणिक होतं, त्यांत आडपडदा नव्हता, त्यांत आपुलकी होती, त्यांचा नेहमींचा विनोदहि होता. राजकारणपटु म्हणून नाहीं पण एक मनुष्य म्हणून माझ्या अंगीं जे गुण आहेत असं त्यांना वाटत त्यांबद्दल त्यांनीं आपल्या भाषणांत मुक्तकंठानं स्तुति केली आहे. त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें. पण त्याचबरोबर मला आपणाला अशी नम्र विनंति करावयाची आहे कीं, वरवर दिसणाऱ्या त्यांच्या या भोळेपणाला किंवा स्वतःसंबंधानं इतरांच्या मनांत सद्‌भावना निर्माण करण्याचं जें कसब त्यांनीं आत्मसात् केलेलं आहे. त्या कसबाला आपण भुलून जातां कामा नये. कारण त्यांचे दाखवायचे दांत एक असून चावयाचे दांत निराळे आहेत, शेक्सपिअरच्या अमर अशा शोकपर्यवसायी नाटकांतील ब्रूटसप्रमाणें लिंकन हे एक सन्माननीय सद्‌गृहस्थ आहेत. पण प्रतिस्पर्ध्याची जेव्हां कल्पनाहि नसेल तेव्हां त्याच्या उरांत खंजीर खुपसण्याच्या कलेंत ब्रूटसप्रमाणें हेहि निष्णात आहेत. सद्‌गृहस्थहो, त्यांनीं मला घायाळ करण्याचा प्रयत्न केला आहे आणि तरीहि येन केन प्रकारेण मी ताठ उभा आहें. कदाचित् सत्याचा आधार असल्यामुळं मी उभा असेन. शस्त्रानं तुकडे तुकडे करून सत्याला सप्तपातळाच्या तळाशीं गाडलं तरी तिथूनहि तें आपलं डोकं वर काढल्याशिवाय राहात नाहीं. त्या सत्याचाच भरभक्कम आधार मला असल्यामुळें मी हा असा उभा दिसतों आहें. लिंकन विनोदाची पेरणी करून पहिल्यानं तुम्हांला हसवतात आणि मग दक्षिण विभागांत गुलाम-कामकऱ्यांची कोण दैना उडालेली आहे याचीं भीषण चित्रं आपणापुढें उभीं करून ते तुम्हांला रडायला लावतात. ते तुम्हांला मोठ्या खुबीनें झुलवीत झुलवीत सत्याच्या उंबरठ्यापर्यंत नेतात पण तो तुम्ही ओलांडणार असा रंग दिसतांच ते तुम्हांला तिथून मागें खेंचतात. आतां हेंच पाहा. या आपल्या उत्तरेकडच्या विभागांत कामगारांची परिस्थिति किती भयंकर आहे याबद्दल ते चुकून तरी कधीं उल्लेख करतात काय? कधींच नाहीं. त्यांची दृष्टि न्यू इंग्लंडपर्यंत पोहोंचूंच शकत नसावी; आणि म्हणूनच या भागांतील कापडगिरण्यांत काम करणाऱ्या हजारों स्त्रीपुरुषांनीं अलीकडे

संप पुकारला असल्याचं त्यांच्या गांवींहि नाहीं. त्यांना संप कां पुकारावा लागला? कारण पहांटेपासून रात्रींपर्यंत–दररोज चौदा तास–'स्वतंत्र' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या या नागरिकांना राक्षसी कारखान्यांतील मागांवर सक्तीनं काम करावं लागतं. बिचाऱ्यांना कधीं सूर्यदर्शनहि घडत नाहीं; आणि मग, अक्षरशः आपल्या रक्ताचं पाणी करून इतके तास सतत काम केल्यानंतर उंदीरघुशींनासुद्धां राहाणं अशक्य अशा आपल्या खबदाडा-सारख्या खोपटांत कसंबसं जाऊन त्यांनीं पडायचं. याला काय स्वातंत्र्य म्हणायचं? आणि मॅसाच्युसेट्समध्यें परिस्थिति काय आहे हें जरी लिंकनच्या कानावर आलं नसलं तरी खुद्द आपल्या या प्रांतांत इलिनॉईझ सेंट्रल रेल्वे बंद पडली आहे हेंहि त्यांना दिसूं नये काय? ती कां बंद पडली तर जुलुमाखालीं चिरडल्या जाणाऱ्या रेल्वे कामकऱ्यांनीं संप पुकारला म्हणून! त्यांनींमुद्धां जीवनवेतनाची मागणी केली आहे? दक्षिण विभागांत प्रत्येक ठिकाणीं हीच परिस्थिति आहे. भुकेनं तडफडणारीं माणसं रस्त्यारस्त्यांतून मोर्चे काढताहेत, आपल्या मुलाबाळांचे प्राण त्यांना जगवतां येणं शक्य नाहीं म्हणून दंग्याधोप्यांना उत्तेजन देत आहेत. कसलं स्वातंत्र्य? ही कसली समता? लिंकन नेहमीं समतेचं तुणतुणं वाजवीत असतात. लव्हजॉय आणि इतर गुलामगिरीविरोधी पुढारी जे मुद्दे मांडतात ते लिंकन पुन्हां पुन्हां सांगत असतात. म्हणजे असं कीं, स्वातंत्र्याच्या सनदेनें सर्व माणसांना स्वातंत्र्य आणि समता यांचं तत्त्व बहाल केलं असल्यामुळें नीग्रोंनाहि हे अधिकार मिळालेले आहेत असा त्यांचा दावा. ड्रेडस्कॉटच्या खटल्याच्या वेळीं चीफ जस्टिस टॅने यांनीं या हास्यास्पद कल्पनेच्या विरुद्ध निकाल दिलेला आहे. सदर निकालानुसार नीग्रो हे कनिष्ठ दर्जाचे मानव असून श्रेष्ठ दर्जाच्या मानवांनीं त्यांना आपल्या हुकमती-खालीं आणून गुलाम बनवलं आणि म्हणून इतर मालमत्तेप्रमाणेंच नीग्रो हेहि त्यांची मालमत्ता आहेत असं कायद्यानें ठरून गेलं आहे. पण लिंकन सुप्रीम कोर्टाच्या अधिकाराबद्दलच शंका उपस्थित करीत आहेत. त्यांनीं तसं स्पष्ट शब्दांत म्हटलेलं नाहीं पण त्यांच्या शब्दांचा मथितार्थ असाच होता कीं, ड्रेड स्कॉटच्या दाव्याचा निकाल पूर्वग्रहदूषित अशा प्रकारें देण्यांत आला होता आणि लोकमताच्या जोरावर तो धाब्यावर

बसविण्यांत आला पाहिजे. लिंकन हे स्वतः वकील आहेत. तेव्हां सुप्रीम कोर्ट हें निःपक्षपाती असून त्यानें दिलेला निकाल म्हणजे वेदवाक्य आहे हा लोकांचा विश्वास उडवून लावण्याचा प्रयत्न करणं म्हणजे क्रांतीचा प्रचार करणंच होय हें त्यांना समजत असलं पाहिजे असं मी धरून चालतों. घटनेला अनुसरून ज्यांच्या हातीं आज सत्ता आली आहे त्यांच्याविरुद्ध द्वेषाचं विष फैलावून देशांत बंड उभारण्याचा हा त्यांचा प्रयत्न चालला आहे. कायद्याचा आश्रय घेण्याऐवजीं बहुजनसमाजाला भडकवून त्यांच्याकरवीं त्यांना भाऊगर्दी करायची आहे. ते एका भावाविरुद्ध दुसऱ्या भावाला चिथावणी देत आहेत. या सगळ्या भडक मार्गांचा एकच ठरलेला परिणाम होणार–आणि तो म्हणजे यादवी युद्ध ! ड्रेड स्कॉटच्या निकाला-संबंधानं मला काय वाटतं असं ते विचारतात. त्याला माझं अगदीं असंदिग्ध भाषेंत असं उत्तर आहे कीं, ' सुप्रीम कोर्टानं दिलेला निकाल हा या राष्ट्रांतला अखेरचा निर्णय असून तो मला वेदवाक्यासारखा प्रमाण आहे आणि म्हणूनच तो मला सर्वतोपरी शिरोधार्य आहे. 'वांशिक समते ' चा अखंड घोष करीत-नीग्रोंना मतें द्या, त्यांच्याबरोबर खा, प्या, झोंपा, लग्न-मुद्धां लावा असा या माथेफिरू माणसांनीं माझ्या कानाशीं अष्टौप्रहर शंख-ध्वनि केला तरी माझा हा निर्णय एक रतिभरहि ढळणार नाहीं. याच्यापुढें जाऊन मला असंहि म्हणायचं आहे कीं प्रत्येक राज्यानं आपापल्या पुरतं पहावं, दुसऱ्या राज्याच्या कारभारांत आपलं नाक खुपसूं नये. आपण हें तत्त्व आचरणांत आणल तर लिंकनच्याही हें लक्षांत येईल कीं, गुलामगिरीची प्रथा असलेले आणि नसलेले–दोन्हीहि प्रकारचे प्रांत या संघराज्यांत आकाशांत सूर्य तळपतो आहे तोंपर्यंत गुण्यागोविंदानें नांदूं शकतील. आपण आजपर्यंत जसे वागलों तसेच यापुढेंहि वागूं या. आपण आपली संपत्ति वाढवूं या, लोकसंख्या वाढवूं या, सामर्थ्य वाढवूं या–म्हणजे सगळं जग आपल्यावर स्तुतिसुमनं उधळील आणि आपल्याकडे पाहतांना जगाच्या छातींत धडकी भरेल आणि आपल्याकडे डोळा वर करून पाहण्याची कोणालाहि छाती होणार नाहीं. ( श्रोत्यांकडे रोंखून बघतो–मग मागें वळून कपाळावरचा घाम पुसतो व आपल्या खुर्चीवर जाऊन बसतो. )

**निनिअन :** ( उठून ) अब्राहम लिंकन. ( एब आपली टांचणं चाळतो.

हॅट काढून ठेवून टांचणं हॅटमध्यें ठेवतो. नंतर सावकाश उठून पुढें येतो. तो सावकाश व मुद्देसूद बोलतो. त्याचे शब्द आत्यंतिक तळमळीनें उच्चारले जात असल्यामुळें त्याच्या भाषणाचा श्रोत्यांवर सहजच परिणाम होतो )

**एब :** खंजीर खुपसण्याचं माझं कौशल्य अद्भुत असल्याबद्दल न्यायमूर्ति डग्लस यांनीं मला प्रशस्तिपत्र बहाल केलं आहे. त्या प्रशस्तिपत्राबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे. पण खजिराचे हात त्यांना माझ्याहूनहि अधिक चांगले माहीत आहेत हें मला प्रांजळपणें कबूल केलंच पाहिजे. ते एकाच वेळीं दहा दहा खंजीर हवेंत परजूं शकतात. पण आपलं सुदैव हें कीं, या कलेंत ते अत्यंत निष्णात असल्यामुळें त्यांतला एकहि खंजीर खालीं पडून कुणालाहि जखम करीत नाहीं. दक्षिण विभागांत रूढ असलेली गुलाम-गिरीची प्रथा अजिबात डावलून, तिचा फैलाव उत्तरेकडेहि होऊं लागला आहे याबद्दल ते आकाशपाताळ एक करूं शकतात. संघराज्याशीं सर्वांनीं एकनिष्ठ राहिलं पाहिजे आणि दक्षिण विभागाला सार्वभौम अधिकार असले पाहिजेत हीं दोन्ही वाक्यं ते एकाच दमांत बोलूं शकतात. नीग्रोंना मतें द्या, त्यांच्याबरोबर खा, प्या, झोपा, लग्न लावा. असं प्रतिपादणारांचा न्याय-मूर्तींनीं जो उल्लेख केला तो आपण सर्वांनीं ऐकलात. सदर आरोपांचा रोख मुख्यतः माझ्यावरच होता कीं काय हें मला समजायला कांहीं मार्ग नाहीं. पण जर तो असलाच तर मी त्यांना एवढंच सांगूं इच्छितों कीं, एकहि नीग्रो स्त्री मला गुलाम म्हणून राहायला नको आहे, याचा अर्थ ती मला माझी पत्नी व्हायला हवी आहे असा होतोच असं नाहीं. मला ती गुलामहि राहायला नको आहे आणि माझी पत्नीहि व्हायला नको आहे. मला तिच्याशीं कांहीं कर्तव्यच नाहीं. कांहीं बाबतींत तिला माझी बरोबरी करतां येणार नाहीं; पण मी तरी प्रत्येक बाबतींत न्यायमूर्तींशीं कुठें बरोबरी करूं शकतों आहें ? पण स्वतःच्या श्रमांनीं मिळवलेली भाकरी खायला दुसऱ्या कोणाच्या परवानगीची आवश्यकता नसणं या जन्मसिद्ध हक्काच्या बाबतींत ती माझ्या किंवा इतर कोणाच्याहि बरोबरीचीच आहे; आणि नीग्रोंशीं झोंपण्याविषयींच म्हणाल तर ज्या विभागांत ही गुलामगिरीची प्रथा चालू आहे त्या विभागांत चार लाखांहून अधिक मिश्र प्रजा जन्माला आलेली आहे याची न्यायमूर्तींनीं दखल घेतली

आहे काय ? आणि ही बहुतेक प्रजा गुलामगिरीच्या विरोधकांनीं जन्माला घातलेली आहे असं मला वाटत नाहीं. या पक्षाचं नांव उच्चारल्या-बरोबर नजरेसमोर न्यू इंग्लंड उभं राहात आणि न्यायमूर्तींनी आपल्या भाषणांत त्याचा उल्लेख केलाच आहे. न्यायमूर्तींना मी असं सांगू इच्छितों कीं, मीं न्यू इंग्लंड पाहिलेलं आहे कारखाने या नांवानं ओळखल्या जाणाऱ्या विटांच्या अंधारकोठड्या आणि रात्रीच्या काळोखांत त्यांतून दमूनभागून बाहेर पडणारे कामकरी मी पाहिलेले आहेत. त्या कारखान्यांत, नीग्रो गुलामांनीं गोळा केलेल्या कापसापासून कापड तयार करण्यांत येतं आणि तें काम गोरे लोक करतात. हे गोरे लोक आणि गुलाम यांच्यांत दररोज फक्त पन्नास सेंट्सचं अंतर असतं, हेंहि मी जाणतों. अमेरिकन नागरिक या नात्यानं या परिस्थितीबद्दल मी अभिमान बाळगूं शकत नाहीं. पण एक अमेरिकन नागरिक या नात्यानें मीं हें मात्र नक्की विचारूं शकतों कीं, उत्तर विभागांत ज्या कामकऱ्यांनीं संप पुकारला आहे ते दक्षिण विभागांतील गुलामांशीं अदलाबदल करायला तयार आहेत काय ? त्यापेक्षां ते असंच नाहीं का म्हणणार कीं—निदान आपल्या परिस्थितीवरील उपाय आपल्याच हातांत आहे म्हणून ? आणि एक अमेरिकन नागरिक या नात्यानंच मी असं म्हणतों कीं, आम्हां अमेरिकनांना संप करण्याचा हक्क आमच्या सरकारनें दिलेला आहे याबद्दल आपण परमेश्वराचे आभार मानले पाहिजेत. मी बंड उभारायला शिकवीत नाहीं. हा देश आणि यांतील सर्व संस्था या देशांतील नागरिकांच्या मालकीच्या आहेत. या देशांतील लोकांना प्रचलित सरकारचा कंटाळा येईल तेव्हां आपल्या घटनात्मक अधिकारांचा उपयोग करून तें त्यांना बदलून घेतां येईल किंवा क्रांति घडवून आणून तें त्यांना उलथूनहि पाडतां येईल. ज्या आपल्या पूर्वजांनीं हें संघराज्य स्थापलं त्यांनीं आपल्याला विशेष कांहीं दिलेलं असलं तर तें हें आहे. तसंच, सुप्रीम कोर्टावर अविश्वास दाखवण्याची शिकवणहि मी देत नाहीं. माझं एवढंच म्हणणं आहे कीं, मर्त्य माणसांनीं दिलेले निर्णय पुष्कळदां पूर्वग्रहानें दिलेले असण्याचा संभव असतो—आणि सुप्रीम कोर्टांतहि मर्त्य माणसंच आहेत आणि योगायोग असा कीं, त्यांतलीं पुष्कळशीं दक्षिण विभागांतल्या बड्या

वर्गांतलीं आहेत. अशी एक जुनी म्हण आहे कीं, न्यायाधीश हे सर्वसामान्य माणसाइतकेच प्रामाणिक असतात-त्याच्याहून अधिक प्रामाणिक नसतात. या म्हणीचा जनक कोण असा तुम्हांला प्रश्न पडला असला तर मी तुम्हांला सांगतों कीं, या म्हणीचा जनक टॉमस जेफरसन होता. ( हें बोलत असतांना एब मागें वळून डग्लसकडे बघतो. ) ड्रेड स्कॉट केसच्या निर्णयाचा उद्देश एकच आणि तो म्हणजे संघराज्यांतील सर्व राज्यांमध्यें नीग्रोंच्या रूपानें मालमत्ता मिळविणें. मालमत्तेशिवाय दुसरें कांहींहि नाहीं. मानवी हक्क आणि मालमत्तेचे हक्क यांच्यांतील हा झगडा फार जुना आहे आणि न्यायमूर्ति डग्लसची आणि माझीहि जीभ कायमची बंद पडल्यानंतरहि या देशांत तो तसाच चालू राहणार आहे. दोन तत्त्वांमधील हा चिरंतन स्वरूपाचा झगडा आहे. मानवांचा सर्वसाधारण हक्क आणि राजेलोकांचा दैवी हक्क यांच्यामधलं भांडण आहे हें. यामुळेंच, ' तुम्ही कष्ट करा, काम करा, भाकरी मिळवा आणि मी ती खाईन— ' असं कांहीं लोक म्हणत असतात. मग हे शब्द उच्चारणारा मनुष्य आपल्या प्रजाजनांच्या निढळाच्या घामावर चैन करणारा राजा असो किंवा आपल्याहून निराळ्या वंशांत जन्म घेणाऱ्या माणसांना आपले गुलाम बनवणारा एखादा माणूस असो, दोहोंतहि तत्त्व एकच आहे. आपल्या राष्ट्राची उभारणी झाली तेव्हां प्रारंभीं आपण असं ठरवलं कीं, ' सर्व मानव जन्मतः सारखेच आहेत. ' स्वातंत्र्याच्या सनदेंत या नियमाला अपवाद म्हणून आपण कोणाचाहि उल्लेख केलेला नव्हता. पण आतां आपण त्याच ठरावाचा अर्थ जवळ जवळ असा समजूं लागलों आहोंत कीं, ' नीग्रोंच्या शिवाय बाकीचे सारे मानव जन्मतः सारखेच आहेत. ' आपण हें वंशाचं किंवा वर्गाचं तत्त्व एकदां मान्य केलं म्हणजे ' नीग्रो, परदेशीय, कॅथॉलिक्स, यहुदी किंवा केवळ दरिद्री लोक यांच्याखेरीज सर्व लोक जन्मतः समान आहेत ' असा कायदाच करायला आपला हात कोण धरूं शकणार आहे ? गुलामगिरीची प्रथा सध्यां आहे तशीच कायम राहूं द्यावी असा अट्टाहास करणारे लोक अशाच वृत्तीकडे आपल्याला नेत आहेत. उत्तर आणि दक्षिण या दोन्ही विभागांतील अनेक सद्‌गृहस्थ पुढील बाबतींत न्यायमूर्तींशीं सहमत आहेत. 'मुद्दाम भांडण उकरून काढूं नका-' ' प्रत्येक

राज्याला स्वतःपुरतं पाहूं द्या —' वगैरे. हा मार्ग तात्पुरता बिनधोक्याचा वाटतो आहे. पण त्यांत अतर्भूत असणाऱ्या खऱ्या धोक्याचा मी तुम्हांला इशारा देऊन ठेवतों. तुम्हीं आपल्या बांधवांवर जर गुलामगिरी लादलीत, त्यांना माणसं या नात्यानें तुम्हीं ओळखीत नाहींसे झालांत, माणसाला म्हणून जो कांहीं मान असतो त्यापासून त्यांना वंचित केलंत, त्यांना पशूंच्या कोटींत नेऊन बसवलंत, जगांत त्यांना कवडीचीहि किंमत नाहीं अशी त्यांची परिस्थिति करून टाकलीत, तर जो ब्रह्मराक्षस तुम्हीं निर्माण केला आहे तो एक ना एक दिवस उलटून तुम्हांलाच फाडून टाकणार नाहीं अशी तुम्ही खात्री देऊं शकतां काय ? स्वातंत्र्य कोणाला मिळावं आणि कोणाला नाहीं असा भेदभाव तुम्ही करूं लागलांत तर त्याचे परिणाम तुम्हांला काय भोगावे लागतील हें तुम्हीं लक्षांत घेतलंच पाहिजे. मी यादवी युद्धाला चिथावणी देत नाहीं. ज्या लोकशाहीमुळें आपणाला मोठेपणा प्राप्त झाला आणि जी लोकशाही आपल्या मोठेपणांत अधिक भरहि घालूं शकेल तिच्यांतील मूलभूत चांगल्या बाजू लोकांच्या मनावर पुन्हां पुन्हां ठसविण्याचा मी प्रयत्न करीत असतों आणि माझ्या जिव्हेंत शब्दोच्चाराची ताकद आहे तोंपर्यंत तें मी करीतच राहीन. गुलामगिरीची प्रथा चालूं ठेवावी असं ज्यांचं प्रामाणिक मत आहे त्यांच्यामुळेंच केवळ नव्हे तर त्याहूनहि अधिक प्रमाणांत न्यायमूर्ति डग्लस यांच्याप्रमाणें जे लोक सध्यां ' गुलामगिरीच्या प्रश्नाचा तूर्त विचारच करूं नका ' असं म्हणत आहेत त्यांच्यामुळें लोकशाही धोक्यांत आली आहे असं मला प्रामाणिकपणें वाटतं. पापाकडे डोळेझांक करण्याच्या या थातुरमातुर वृत्तीची मला मनस्वी चीड आहे. चीड अशासाठीं कीं, आपल्या लोकशाहीला जगाच्या पाठीवर जो मान आहे त्याला अशा वृत्तीमुळें धक्का पोहोंचतो; कोणत्याहि स्वतंत्र संस्थांच्या शत्रूंना आपणाला ढोंगी म्हणून हिणवण्याची संधि मिळते; स्वातंत्र्याचे जे खरेखुरे पुरस्कर्ते आहेत त्यांच्या मनांत आपल्या प्रामाणिकपणाविषयीं शंका निर्माण होते; आणि या सर्वांहून विशेष म्हणजे अशा प्रकारची वृत्ति ही नागरिक स्वातंत्र्याच्या मूलभूत तत्वाशींच उघडपणें विरोध करायला आपल्यांतील कित्येक सत्प्रवृत्त लोकांनाहि भाग पाडते. मग हे लोक स्वातंत्र्याच्या सनदेनें लोकांना दिलेले हक्क जुमानीत नाहींसे

होतात आणि स्वार्थाची जोपासना करणं हेंच प्रत्येकाचं खरं कर्तव्य आहे असं अट्टाहासानं प्रतिपादूं लागतात. मधाशीं आपल्या भाषणाच्या अखेरीला न्यायमूर्तींनीं सांगितलं कीं, आपल्याकडे पाहतांना जगाच्या छातींत धडकी भरेल आपणाला जगाच्या छातींत धडकी भरायला लावायचं आहे असं मला वाटत नाहीं. त्यापेक्षां कोणताहि मनुष्य स्वतंत्र व्हायला लायक आहे याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणून आपला देश जगाचं स्फूर्तिस्थान ठरूं द्या. परंतु राष्ट्र या नात्यानें जगण्याची आणि वाढ करून घेण्याची आपली लायकी आपण सिद्ध करून दाखविल्याशिवाय आपण इतरांना स्फूर्ति कशी देऊं शकणार? आणि आपले सगळे प्रांत संघराज्यांत एकत्रित राहिले तर आपण या दोहोंपैकीं कांहींच करूं शकणार नाहीं स्वातंत्र्याची व्याख्या एकाच्या बाबतींत एक आणि दुसऱ्याच्या बाबतींत मात्र निराळी अशी होऊंच शकत नाहीं. कोणताहि मनुष्य कोणत्याहि पंथाचा असो, कोणत्याहि वर्गांतील असो, कोणत्याहि वंशाचा असो, स्वातंत्र्याची व्याख्या सर्वांच्या बाबतींत एकच एक असली पाहिजे. ‘ ज्या घरांत फाटाफूट आहे तें उभें राहूं शकत नाहीं ’ देशाच्या अर्ध्या विभागांत गुलामगिरीची प्रथा आणि अर्ध्या विभागांत पूर्ण स्वातंत्र्य—अशा चमत्कारिक परिस्थितींत या सरकारचें आसन स्थिर राहणें शक्य नाहीं. ( वळून आपल्या खुर्चीवर जाऊन बसतो. प्रकाश कमी होत जातो. )

## दृश्य १० वें

स्प्रिंगफील्डमधील लिंकनच्या घरांतील बैठकीची खोली. १८६० सालच्या वसंतऋतूंतील दुपारची वेळ. दृश्य ६ व ८ मध्यें दिसत होती तीच ही बैठकीची खोली. एब उजवीकडील एका कोंचावर बसलेला असतो. त्याचा सात वर्षांचा मुलगा टॅड त्याच्याजवळ बसलेला असतो. त्याचा नऊ वर्षांचा मुलगा विली पलीकडे असतो. त्याचा सर्वांत मोठा व हार्वर्ड विश्वविद्यालयांत शिकत असलेला सतरा वर्षांचा मुलगा रॉबर्ट खिडकीशीं बसून ऐटींत पाईप ओठींत असतो. त्या लहान मुलांना एब गोष्ट सांगत असतांना तो तिथून

ऐकत असतो. जॉशुआ स्पीड डावीकडे बसलेला आहे.

**एब :** ( कोंचावर बसलेला. मांडीवर टॅड–त्याच्या पलीकडे विली. ) समजलास का टॅड ? त्या वेळीं रस्ते असे मोठाले नसत–जवळ जवळ पाऊलवाटाच असत म्हण; त्यांतून काळोख अगदीं मिट्ट पडलेला. त्यामुळें वाट दिसणं कठीणच होतं मला—

**विली :** मग भीति वाटली का हो तुम्हांला ?

**एब :** तर ! भयंकर भीति वाटली—

**विली :** रेड इंडिअन लोकांची ना ?

**एब :** छे–छे–त्या भागांत ते शिल्लकच उरले नव्हते. मी वाट चुकेन याची भीति पडली होती मला. तसं झालं असतं तर तो मुलगा बिचारा मेला असता आणि त्याचं पाप मलाच लागलं असतं. पण शेवटीं एकदांचा सांपडला बुवा डॉक्टर. बिचारा अगदीं दमून गेला होता– झोंपायच्याच तयारींत होता. मी त्याला न्यायला आलों आहें म्हणून सांगितलं तेव्हां कुरबुरायलाच लागला तो. पण मीं त्याला ताबडतोब माझ्याबरोबर निघायला लावलं.

**विली :** पण तो मुलगा मेला होता कीं काय डॉक्टर आले तेव्हां ?

**एब :** छे–छे–डॉक्टरनीं त्याला खूप खूप औषध दिलं.

**टॅड :** तें औषध अगदीं कडू कडू असेल नाहीं ?

**एब :** कडूच असणार. पण तें लागू पडलं. त्या माणसांची नि माझी त्या-नंतर पुन्हां भेट झाली नाहीं–पण त्यांची हकीकत मला कळत असते वरच्या-वर. त्या वेळीं तो मुलगा तुझ्याच एवढा होता विली. पण आतां किती मोठा झाला आहे ! आपल्या टॅडएवढा मुलगा आहे त्याला आतां. त्याचं खूप मोठं शेत आहे एका दरींत–आणि त्या शेताला बर्फाच्या डोंगरावरून वाहत येणाऱ्या नदीचं पाणी मिळत असत. ( उजव्या बाजूनें मेरी प्रवेश करते. )

**मेरी :** रॉबर्ट, पाईप ओढीत बसला आहेत तूं इथं ?

**रॉबर्ट :** ( उठून ) होय आई.

**मेरी :** मी तुला कित्तीदां सांगितलं आहे कीं, या माझ्या खोलींतच नव्हे तर या सबंध घरांत कुठंहि तंबाखूचा धूर सोडलेला मला खपत नाहीं. तुला वाटलं असेल—

**एब :** जाऊं दे ग. हार्वर्ड विश्वविद्यालयांत जाऊं लागला आहे तो, त्याला बोलतांना तुला आतां जरा सावधगिरीच बाळगली पाहिजे. तूं आपला पाईप घेऊन शेडमध्येंच जा कसा बॉब—

**रॉबर्ट :** बरं बाबा–( जायला निघतो. )

**मेरी :** आणि पुन्हां मला हें सांगण्याची वेळ आणूं नकोस—

**रॉबर्ट :** नाहीं आणणार–( डाव्या बाजूनें जातो. )

**एब :** या नवीन वसाहती वसविणारांपैकीं कांहीं लोक मित्र होते माझे. त्याची गोष्ट सांगत होतों मी आपल्या मुलांना.

**मेरी :** पण त्यांची जेवायची वेळ झाली आतां–( मुलें लगेच उभीं राहतात.)

**विली :** पण मग पुढें काय झालं बाबा ?

**एब :** पुढें काय व्हायचं आहे ? त्यानंतर तीं सगळीं माणसं सुखानं राहूं लागलीं. आतां जेवायला चला पाहूं—( विली व टॅड धावत निघून जातात. खोलींत कोंडलेला धूर बाहेर निघून जावा म्हणून मेरी खिडक्यांचे पडदे उघडून टाकीत असते. )

**जॉश :** साडेचार झाले एब. तीं माणसं आतां कोणत्याहि क्षणाला येतील इथं.

**एब :** अरे बापरे !

**मेरी :** कोण माणसं ?

**एब :** पूर्व विभागांतून कांहीं माणसं यायचीं आहेत. त्यांतला एक माणूस फार मोठा राजकीय पुढारी आहे–क्रिमिन नांव त्याचं. दुसरा एक कारखानदार आहे–त्याचं नांव स्टव्हेंसन. तिसरा—

**मेरी :** ( आदरबुद्धीनें ) हेन्री स्टव्हेंसन ?

**एब :** होय तोच. तिसरा बॉस्टनचा रेव्हरंड डॉक्टर बॅरिक—

**मेरी :** ( आवाजांत धार ) कशाला येणार आहेत ते ?

**एब :** अमुकच असं नक्की कारण माहीत नाहीं मला. पण युनायटेड स्टेट्सच्या अध्यक्षपदासाठीं उमेदवार म्हणून उभा राहायला मी लायक आहें

कीं नाहीं हें पारखण्याचा बेत असावा त्याचा– ( मेरी स्तब्ध उभी राहते ) मला वाटतं, आपण अजूनहि लाकडांच्या खोपटांत राहून आपल्या बिछान्याखालीं डुकरं ठेवतों कीं काय हें पाहायचं असावं त्यांना.

**मेरी :** ( रागानें ) आणि हें मला सांगितलंत नाहीं तुम्हीं ?

**एब :** रागावू नकोस मेरी. तुला हें सांगायचं अजिबात विसरून गेलों मी–

**मेरी :** ( त्याच्याजवळ जाऊन ) आतांपर्यंत आपल्या घरीं आलेल्या कोणाच्याहिपेक्षां बडे पाहुणे आज इथं यायचे आहेत आणि हें मला सांगायला विसरलांत तुम्ही ?

**एब :** अग, ते पाहुणे नाहींत. ते इथं धंद्याच्या निमित्तानं येणार आहेत.

**मेरी :** ( फणफणत बाजूला जाते. मग एबकडे वळून ) वाः ! मोठाच महत्वाचा धंदा ! म्हणे, आमची परिस्थिति पहायला येताहेत ! आमची कसली परिस्थिति ? आम्ही आपलीं ओबडधोबड, निष्काळजी, अडाणी, पश्चिम विभागांतलीं जंगलीं माणसं ! आमच्या घरांत दिवसाचे चोवीस तास तंबाखूची घाण येत असायची—

**एब :** आपला एक मुलगा हार्वर्ड विश्वविद्यालयांत शिकतो आहे हें नाहीं का सांगतां येण्यासारखं त्यांना आपल्याला ?

**मेरी :** ते येणार असल्याचं मला जरा आधीं सांगितलं असतं तर ? मला तेवढाच वेळ तरी मिळाला असता साफसफाई करायला. आणि तुम्ही नवीन कपडे कां नाहीं घातलेत अंगांत ? आणि पायांत अजून हे घाणेरडे बूटच आहेत ना ?

**एब :** अगदींच विसरलों मी, मेरी—

**मेरी :** अब्राहम लिंकन, मला खरोखरच असं वाटतं कीं, मी तुमची बायको नसून जर गुलाम असतें तर तुम्ही मला अधिक आपुलकीनं वागवलं असतं. आपण दोघांनीं मिळून जें जीवन जगायचं आहे त्याबद्दल मलाहि कांहीं कळकळ वाटत असेल, त्याच्याशीं माझाहि कांहींतरी संबंध असेल, असा नुसता विचार तरी तुमच्या मनाला शिवला आहे का हो कधीं ?

**एब :** माझे बूट जरा झकपक करतों हं मी–( तिच्या तोफखान्यांतून सुटका करून घेण्यासाठीं बाहेर जातो. मेरी त्याच्याकडे पाहत राहते, तिचे ओठ थरथरत असतात. ती आपले अश्रु कसेबसे आवरते. )

**मेरी :** ( कोंचाच्या उजव्या बाजूवर बसून—दुःखानें ) जॉशुआ स्पीड, हा पाहिलात ना आमचा संसार ? यांचं पहिल्यापासूनच हें असं. पहिल्यानं मागणी घालायची, मग आपणच ती मागं घ्यायची, पुन्हां मनानं उचल खायची, पुन्हां मागणी घालायला यायचं, मग लग्न करायचं—अठरा वर्षं चालला आहे हा गोंधळ. आणि वर पुन्हां मीच कडवट, मीच घालून-पाडून बोलणारी; त्यांचा तेजोभंग करून त्यांना आपल्या पातळीवर आणूं पाहणारी असं जगानं म्हणायचं. तुम्हांलाहि तसंच वाटतं ना ?

**जॉश :** ( सावकाशपणें कोंचाच्या डाव्या बाजूला जाऊन ) नाहीं मेरी- तसं मला वाटत नाहीं. एबला मी चांगलं ओळखतों हें कसं विसरतेस तूं ?

**मेरी :** यांच्यासारखा माणूस साऱ्या जगांत नाहीं सापडायचा ! जगांत ज्यांनीं ज्यांनीं मोठेपणा मिळविला अशा कित्येक माणसांचीं चरित्रं मीं वाचलेलीं आहेत. त्यापैकीं बहुतेकांना आपल्या मार्गांतले शत्रु नेस्तनाबूत करण्यासाठीं आणि आपल्या मित्राना आपली लायकी पटवून देण्यासाठीं तसू तसू जागा लढवावी लागली होती. पण याच्यांत त्यातलं कांहींच नाहीं. यांना मुळीं कोणी शत्रूच नाहीं आणि याच्या सगळ्या मित्रांचा याच्यावर पुरेपूर विश्वास आहे. याची नि माझी भेट होण्यापूर्वींच यांचा भविष्यकाळ उज्ज्वल आहे असं मीं ऐकलं होतं आणि त्यांची नि माझी भेट झाल्यादिवशींच त्याबद्दल मला स्वतःलाहि खात्री वाटूं लागली. पण याचा त्याच्यावर विश्वास नव्हता आणि मनातल्या मनांत तो असलाच तरी मोठेपणाची याना इतकी भीति वाटायची कीं, त्यानं त्याच्याकडे येऊं नये म्हणून हे आपल्या प्रयत्नाची शिकस्त करायचे. दुःखी जीवन अखेर मृत्यूकडे नेणारा काटयागोटयानीं भरलेला मार्ग, अशासंबंधींची एक कविता ते नेहमीं गुणगुणत असायचे ! त्या कवितनं त्यांचा अंतर्बाह्य पछाडलेलं आहे. आज इतकीं वर्षं त्याच्या डोक्यातल त्या कवितेचं वेड काढून टाकण्याचा मी जंग जंग प्रयत्न करीत आले आहें. पण खडकावर आदळणाऱ्या बारीक सारीक लाटाना मागं फिरावं लागतं—तसं झालं माझं आणि आतां एक संधि—मोठ्यात मोठी संधि—आपण होऊन याच्या घरीं चालून आली आहे, त्या संधीचं मा काय करूं शकणार ? या संधीचा

फायदा त्यांनींच घ्यायला हवा. हेंच आपलं जीवितकार्य आहे हें त्यांनाच समजायला पाहिजे. मी हें त्यांच्या डोक्यांत कोंबून काय उपयोग ? अगदीं-अगदीं वीट आला मला या आयुष्याचा ! ( रडूं लागते. ) त्यांच्या थोर लायकीप्रमाणें त्यांनीं मोठं व्हावं म्हणून मला कांहीं ना कांहीं तरी करतां येईल असं वाटत होतं मला–पण कांहींहि करूं शकलें नाहीं मी–माझा मात्र अगदीं चक्काचूर उडाला–( मोठ्यानें हुंदके देऊं लागते. जॉश उठून तिच्याजवळ जातो. )

**जॉश :** ( सहानुभूतिपूर्वक तिच्याजवळ बसून ) मला सगळं माहीत आहे मेरी. पण तूं स्वतःलाच असं घालूनपाडून बोलणं बरं नाहीं. मनुष्य वेडा-पीर असो नाहींतर साधुसंत असो, त्याच्या भवितव्याची दोरी परमेश्वराच्या हातांत असते. एब लिंकनच्या भवितव्याची दोरीहि त्याच्याच हातांत आहे. ( एब येतो. )

**एब :** कसे चकचकीत झाले आहेत माझे बूट, नाहीं मेरी ? ( तो मेरीकडे पाहतो. मेरी आपला आवेग दाबण्याचा कसोशीनें प्रयत्न करते. एब जॉशकडे पाहतो. )

**मेरी :** तुम्ही पाहुण्यांचं इथं स्वागत करा–मी स्वयंपाकघरांत जाऊन त्यांच्यासाठीं कांहींतरी फराळाचं करतें. ( जाते. एब तिच्याकडे पाहत राहतो. त्याला वाईट वाटून तो खालीं बसतो. कांहीं वेळ कोणीच कांहीं बोलत नाहीं. मग एब एकाएकीं बोलूं लागतो. )

**एबः** हे येणारे पाहुणे मोठे वजनदार असतील, नाहीं ?

**जॉश :** तीन प्रांतांतले प्रतिनिधी निवडणं बरंचसं यांच्या हातांत आहे. त्यामुळें ते सिवार्डला त्याची उमेदवारी मागें घ्यायला लावूं शकतात —

**एब :** बरं समज, कांहींतरी मोठा चमत्कार होऊन किंवा माझ्या दैवानं मला हात दिल्यामुळें यांनीं उमेदवाराच्या नात्यानं माझं नांव मंजूर केलंच तर निवडणुकींत मी यशस्वी होऊं शकेन, असं वाटतं तुला ?

**जॉश :** नुसतं वाटतं नव्हे तर माझी खात्री आहे त्याबद्दल. चार उमेदवार रणांगणावर उभे ठाकणार आहेत–ते सगळे एकमेकांवर कोलमडणार आणि कोणाची कल्पनाहि नसलेला भलताच मनुष्य शर्यत जिंकून जाणार !

७...

**एब** : अरे पण तो मुळीं उलट्या बाजूनेंच धांवत सुटला तर ?

**जॉश** : तेंहि खरंच. तुझ्या बाबतींत तसं होणंहि कांहीं अगदीं अशक्य नाहीं. मी तर तुझ्या बाजूनं दोन सेंटचीसुद्धां पैज मारायला तयार होणार नाहीं.

**एब** : ( हसून ) ते सगळे शर्यतीचे घोडे आहेत तर मी टांग्याचं घोडं आहे. आमच्यांत तुलना करतो आहेस तूं–ही मोठी गंमतच आहे. पण माझ्यावर स्वार होणारे जॉकीज मात्र जबरे आहेत–मेंटर ग्रॅहम, बाउलिंग ग्रीन, बिल हर्न्डन, तूं, मेरी–ती तर सगळ्यांत जबरी !

**जॉश** : ( एबकडे पाहून ) त्यांची आतां फारशी दिक्कत नाहीं. एब, त्या सर्वांना तूं कधींच फेंकून दिलं आहेस ! मागच्या शर्यतींत, त्या बिचाऱ्या डग्लसशीं सामना करायचा आहे असं तुला समजतांच तूं कसा विजेसारखा धावत सुटलास ! तूं आतां पुन्हां सुद्धां त्याला मागं टाकूं शकशील–मात्र स्टार्ट घेतल्याशिवाय राहायचंच नाहीं असं तुझ्या मनानं पक्कं घेतलं पाहिजे–आणि तिथंच तर घोडं पेंड खातं आहे–(दारावरील घंटा वाजते. जॉश उठून उभा राहतो. ) मी जरा मेरीला मदत करायला जातों. ( जॉश जातो. एब उठून एका तसबिरीजवळ जातो व तींत आपलें प्रतिबिंब पाहतो. आपला गळापट्टा सारखा करण्याचा तो प्रयत्न करतो पण तें त्याला फारसं साधत नाहीं. मोलकरीण दरवाजा उघडते. स्टव्हेंसन, बॅरिक व क्रिमिन आंत येतात स्टव्हेंसन वयस्क व श्रीमंत दिसतो. त्याच्या मुद्रेवर विशेष असा कसलाच भाव दिसत नाहीं. बॅरिक हा एपिस्कोपॅलियन धर्मसंस्थेंत एक धर्मगुरु असतो. क्रिमिन हा धूर्त, विनोदी मध्यस्थ आहे.

**एब** : या–या असे–या क्रिमिन—( हस्तांदोलन करतो. )

**क्रिमिन** : हे बॉस्टन येथील डॉक्टर बॅरिक आणि हे फिलाडेल्फिया येथील स्टव्हेंसन—

**डॉ. बॅरिक** : मि. लिंकन—

**स्टव्हेंसन** : आपली ओळख झाली—धन्यता वाटते मला—

**एब** : आभारी आहें मी आपला. बसा ना आपण––

**स्टव्हेंसन** : बसतों ना––( ते सर्व बसतात. )

**रॅकिमिन** : मी माझा सिगार पेटवला तर त्याला मिसेस लिंकनची कांहीं हरकत नाहीं ना ?

**एब** : छे–छे–हरकत कसली आली आहे ? आपलं स्वागत करायला ती या वेळीं इथं नसल्याबद्दल मला अतिशय दिलगिरी वाटते. पण आपल्याशीं बोलायला ती येईलच आतां इतक्यांत.

**डॉ. बॅरिक** : ( मोठ्या मनमिळाऊपणें ) त्यांना भेटायला मीं विशेषच आतुर आहे. लॉंगफेलोनं म्हटलं आहे तें पटतं मला. त्यानं म्हटलं आहे, ' धनुष्याला जशी दोरी तशी पुरुषाला स्त्री— '

**स्टर्व्हसन** : ( गंमतीनें ) आणि आपल्या समोरचं हें धनुष्य भलतंच ताठ आहे–( एब थोडी मान वांकवून या प्रशस्तिपत्राचा स्वीकार करतो. ) शिवाय स्पष्टवक्तेपणाबद्दलहि यांचा लौकिक आहे. तेव्हां लिंकन, आम्ही एकदम मुख्य मुद्द्यालाच सुरुवात करतों म्हणून गैरसमज करून घेऊं नका.

**एब** : छे–छे ! माळरानावरचा मुत्सद्दी त्याच्या सत्यस्वरूपांत आपणाला पाहायचा होता म्हणे–तो हा आपणापुढें उभा आहे.

**स्टर्व्हसन** : येत्या निवडणुकीच्या संग्रामांत चांगला सखोल, नवीन सुधारणांचा द्वेष्टा, विश्वास ठेवायला पात्र, अडथळे निवारून पार होऊं शकणारा असा एखादा उमेदवार निवडण्याची आमची जारीनं खटपट चालली आहे हें अगदीं खरं आहे. तुमच्या मित्रांची अशी खात्री आहे– आणि तुमच्या मित्रांची संख्या सबंध देशभर रोजच्या रोज वाढते आहे– कीं, असे तुम्हीच एक उमेदवार आहांत.

**एब** : तें ठीक आहे स्टर्व्हसन. पण मी तुम्हांला सांगतों, पंचवीस वर्षांपूर्वीं न्यू सालेममध्ये मीं जेव्हां पहिली निवडणूक लढवली तेव्हा मी सुधारणावादी नाहीं यासंबंधानं मला पाठिंबा देणारांची खात्री पटवून दिली होती मीं. याबद्दलचा प्रत्यक्ष पुरावाहि मीं त्यांना सादर केला—कारण कोणत्याच दिशेनें मीं कसलीहि प्रगति केली नाहीं !

**डॉ. बॅरिक** : मग आम्ही ज्यांच्या शोधांत आहेंत तसेच गृहस्थ तुम्ही आहांत हें तुम्हांला मान्य आहे एकूण ?

**एब** : इतक्या प्रमाणांत आत्मस्तुति करणं शक्य नाहीं मला; आणि शिवाय

असं कीं, सिवार्डसारखा मनुष्य तुमच्या पक्षाचा उमेदवार म्हणून उभा राहायला तयार आहे. तो मुत्सद्दी असून चांगला सभ्यहि आहे.

**स्टव्हेंसन** : तें कांहींहि असेल. पण आम्ही कांहीं चौकशीमंडळाचे सभासद या नात्यानें इथें आलेलों नाहीं. ( दोघेहि हसतात. ) आपला विशेष परिचय करून घेण्याच्या उद्देशानें आम्ही इथं आलों आहोंत. अर्थशास्त्र, धर्म, राष्ट्रीय स्वरूपाचीं अशीं सर्वसाधारण कामें, यासंबंधींचे आपले विचार काय आहेत ते ऐकायचे आहेत आम्हांला. ( क्रिमिन मानेनें होकार देतो. ) उदाहरणार्थ, एका जाहीर वादाच्या प्रसंगीं आपण कोणीतरी लोकोत्तर पुढारी असल्याच्या तोऱ्यांत उत्तर विभागांतील कारखान्यांच्या परिस्थितीबद्दल सिनेटर डग्लसनीं मुद्दे पुढें मांडले तेव्हां दक्षिण विभागांतील गुलामगिरीच्या रूढीचं चित्र त्यांच्यापुढें मांडून तुम्हीं मोठ्या शिताफीनं त्यांना उत्तर दिलं होतं.

**एब** : होय. तो प्रसंग आठवतो आहे मला. त्यांना उत्तर देतांना मीं असं म्हटलं होतं कीं, गुलामगिरीची प्रथा नसलेल्या प्रांतांत कामकऱ्यांना संप करण्याचा अधिकार असलेला पाहून मला आनंद होतो. पण स्टव्हेंसन, त्या माझ्या उत्तरांत शिताफी नव्हती—सत्य होतं.

**स्टव्हेंसन** : पण त्यामुळें तुम्हांला कामकरीवर्गाचा पाठिंबा मिळायला चांगली मदत झाली, हें फार चांगलं झालं; तसंच तुमच्या त्या भाषणामुळें माझ्यासारख्या उद्योगधंदेवाल्यांच्या पोटांत गोळा उठला.

**एब** : हा विषय लांबवण्याची माझी इच्छा नाहीं. मला असं स्पष्टपणें वाटतं कीं, सरकार जर अन्याय किंवा छळ करीत असेल तर त्याविरुद्ध आपला आवाजच नव्हे तर हातसुद्धां उचलण्याचा प्रजेला अधिकार आहे, या तत्त्वावरच आपल्या राष्ट्राची उभारणी झालेली आहे. बॉस्टन टी पार्टी म्हणजे संपाचाच एक प्रकार होता. खुद्द क्रांतिसुद्धां याच तत्त्वावर झालेली होती. जॅकसनच्या कारभाराविरुद्ध बँकांची संघटना उभी करण्याचा निकोलस बिड्ल्चा प्रयत्नहि यासाठींच होता.

**स्टव्हेंसन** : तें सगळं अगदीं खरं आहे, पण अराजकाचा मनु आतां संपलेला आहे. आतां आपण औद्योगिक वाढीच्या युगांत वावरत आहोंत. शक्य त्या सर्व मालांचं अवाढव्य प्रमाणांत उत्पादन वाढवण्याचा काळ

आहे हा. रेल्वे, आपलें सारें खंड व्यापणारें तारायंत्र वगैरे खाजगी उद्योग-धंद्याच्या क्षेत्रांतल्या धाडशी योजना निर्माण करण्याचा आणि अंमलांत आणण्याचा मनु आहे हा. या सर्व प्रचण्ड उद्योगांचो उभारणी करतांना आमच्या हातांत आमच्या कारखान्यांपुरती निर्भेळ, खरीखुरी सत्ता असणं जरुरीचं आहे. स्पष्ट शब्दांत विचारायचं तर, जर आम्ही तुम्हांला निवडून दिल तर भांडवलदारांच्या हितापेक्षां कामकरीवर्गाचं हित तुम्ही अधिक मानाल का ?

**एब :** या आपल्या प्रश्नाचं उत्तर मला स्पष्ट किंवा संदिग्धहि देतां येत नाहीं मी निवडून आलों तर मी काय करीन कांहींच मला सांगवत नाहीं.

**स्टर्व्हसन :** पण कोणत्या तरी एका बाजूला तुमच्या मनाचा कल असेलच कीं नाहीं ?

**एब :** या वेळीं मी इतकंच सांगूं शकतों कीं, या दोघांत बखेडा निर्माण झालाच तर त्या दोघांनाहि सारखेंच समजण्याचा मी प्रयत्न करीन.

**डॉ. बॅरिक :** लिंकन, सरकारच्या अन्यायाविरुद्ध प्रतिकार करण्याचा प्रजेला हक्क असल्याचं तुम्ही इतक्या ठामपणें घोषित करतां याबद्दल मी तुम्हांला धन्यवाद देतों. पण ज्या सत्तेपुढें प्रत्येकानें आपली मान तुकविलीच पाहिजे ती सत्ता तुम्ही मानतां कीं नाहीं हें जाणून घेण्याचं कुतूहल मला लागलं आहे.

**एब :** हें तुम्ही परमेश्वरासंबंधानं बोलत आहां ?

**डॉ. बॅरिक :** होय.

**एब :** त्याच्या इच्छेपुढें मी आपली मान तुकवीन कीं नाहीं अशी शंका तुमच्या मनांत उत्पन्न होण्याचं कारण ?

**डॉ. बॅरिक :** देवाच्या धर्मसंस्थांविषयीं तुम्हांला कितीसा आदर आहे याबद्दल पुष्कळच लोकांना शंका आहे.

**एब :** तें मला माहीत आहे डॉक्टर. कोणत्याहि चर्चचा सभासद होण्याचं मी नाकारीत असल्यामुळें लोक मला नास्तिक म्हणतात.

**डॉ. बॅरिक :** पण तुम्ही चर्चला जात नाहीं याचं कारण ?

**एब :** जिथं मला माझ्या पद्धतीनें परमेश्वराचं पूजन करतां येईल असं चर्चच मला आतांपर्यंत आढळलेलं नाहीं. येशू ख्रिस्ताच्या उपदेशांतील

वाक्यन् वाक्य कित्येक लोक अविवाद्य आणि शिरोधार्य मानतात, पण तसं करतांना माझ्या मनाला मात्र केव्हां तरी कांहीं तरी खटकल्याशिवाय राहात नाहीं. पण डॉ. बॅरिक, मी तुम्हांला असं ठाम आश्वासन देऊन ठेवतों कीं, आपल्या खुद तारणहारानें गॉस्पेलमध्यें जें म्हटलं आहे कीं, 'तुम्ही' आपल्या अंतःकरणापासून, आपल्या आत्म्याला साक्षी ठेवून, मनापासून परमेश्वरावर प्रेम केलं...पाहिजे आणि आपल्या स्वतःइतकंच आपल्या शेजाऱ्यावरहि तुम्ही प्रेम केलं पाहिजे ' ही आज्ञा शिरसा मान्य करणं एवढीच जर एखाद्या चर्चनें आपल्या सभासदत्वाची अट ठेवली तर त्या चर्चचा सभासद मी खात्रीनं होईन. पण तुम्ही सर्वजण मला जरा माफ करा हं–घरांत कुठंपर्यंत तयारी आली तें मी पाहून येतों– (एब जातो. जातांना दरवाजा ओढून घेतो. क्रिमिन तिकडे पाहत राहतो. मग इतरांकडे वळून)

**क्रिमिन** : काय ? आहे कीं नाहीं चीज ?

**डॉ. बॅरिक** : हा नास्तिक आहे यांत तर शंकाच नाहीं. ध्येयवादी दिसतो लेकाचा–पण चक्रम आणि जुनाट पद्धतीचा—

**स्टव्हेंसन** : आणि जहाल सुधारणावादी !

**क्रिमिन** : सुधारणावादी ? म्हणजे आतां मात्र कमाल केलीत तुम्ही— (हसूं लागतो.)

**स्टव्हेंसन** : हसा तुम्ही क्रिमिन. पण मीं त्याला जो सरळ प्रश्न केला तो त्यानं ज्या पद्धतीनं डावलला ती मला मुळींच आवडली नाहीं. मी तुम्हांला सांगतों, डग्लसइतकाच हासुद्धां 'अस्सल' राजकारणीच दिसतो आहे. बाजारबुणग्या सामान्य लोकांच्या जमावांचीं मनं पेटवणाराच हाहि एक म्होरक्या दिसतो.

**क्रिमिन** : मग ? त्यांचाच पुढारी आहे तो. मूळ मुद्दा डावलून भलतंभलतं बोलून वेळ मारून नेण्यांत तरबेज आहे स्वारी.

**स्टव्हेंसन** : दिसतंच आहे. पण याला जरा संभाळूनच असलं पाहिजे.

**क्रिमिन** : म्हणजे काय ? तुमच्या बोलण्याचा रोंख नाहीं माझ्या लक्षांत आला.

**स्टव्हेंसन** : घातकी आहे हा. बहुजनसमाजाची मर्जी संभाळण्यासाठीं धडपडणाऱ्या माणसाची वृत्ति बहुजनसमाजासारखीच बनायला लागते.

मग समाजांत तो असमाधानाचं विष पेरूं लागतो, त्यांची सामुदायिक उठावणी करूं लागतो.

**क्रिमिन :** पण आपण सिवार्डला उभं केलं तरी काय ? गुलामगिरीची प्रथा ताबडतोब बंद पडली पाहिजे अशी मागणी करीत सुटेल तो आणि त्यामुळें देशांत नक्कीच असंतोष निर्माण होऊन शांततेचा भंग होईल ! माझं ऐका तुम्ही त्याच्यापेक्षां हा लिंकन किती तरी बरा. अर्थशास्त्र घ्या, तत्त्वज्ञान घ्या, नाहीं तर आणखी कांहीं घ्या. कांहींहि असलं तरी आपण आपल्या पक्षाचा म्हणून जो उमेदवार उभा करणार त्याच्यांत मुख्यत्वें करून कोणते गुण असले पाहिजेत असं आपलं म्हणणं आहे ? त्याचा मुख्य गुण हा असला पाहिजे कीं, त्यानं निवडून आलं पाहिजे-आणि तो गुण याच्यांत पूर्णांशानं आहे.

**स्रुव्हेसन :** ( हसून ) आम्हांलाहि इतकी खात्री वाटत असती तर बरं झालं असतं.

**डॉ. बॅरिक :** आम्हांला म्हणजे आम्हां सर्वांनाच—

**क्रिमिन :** तर मग मतदारांच्या कायमच्या मूर्खपणावर विसंबून राहून स्वस्थ बसा. तो नाहीं तरी या त्यांच्या बेवकूफपणालाच आळवणार. (रंगभूमीच्या बाहेर निर्देश करून ) ओबडधोबड दिसणारा, एके काळीं लाकडं फोडणारा हा कामकरी आहे, पण तो अत्यंत धूर्त आणि पक्का बनेल मुत्सद्दी असल्याचा तुम्हांला खात्रीनें प्रत्यय येईल. त्यानं तुमचे प्रश्न डावलले असं तुमचं म्हणणं. त्यानं तें जरूर डावलले-पण किती खुबीनं ? त्याच्यासमोर श्रमजीवि लोकांचा प्रश्न काढा कीं तो लगेच म्हणेल, ‘ लोकशाहीवर माझी नितांत श्रद्धा आहे. ’ धार्मिक बाबतींत त्याचीं मतं काय आहेत याचा वास काढण्याची कोशीस करा-कीं, ‘तुम्ही स्वतःइतकेंच तुमच्या शेजाऱ्यावर प्रेम करा-’ हें वचन तो तुमच्या तोंडावर मारील. आतां हें तर तुम्हांला माहीतच आहे कीं, हीं उत्तरं ऐकल्यावर आपलीं तोंडंच बंद होतात. मी तुम्हांला एवढं हमखास सांगतों कीं, हा मतं नक्की मिळवील. त्याचं नांवसुद्धां लोकांना जवळचं वाटणारं आहे —अब्राहम लिंकन ! प्रामाणिक एब ! तो आत्तांहि आपल्याशीं योग्य व्यवहारीपणानं

वागेल आणि उद्यां आपण त्याला व्हाईट हाऊसमध्यें नेऊन बसविल्या-नंतरहि तो आपल्याशीं असाच व्यवहारीपणानें वागेल. आपण सांगूं तेंच तो करील—

**डॉ. बॅरिक :** ( त्याला खुणावीत ) थांब--तो येतो आहे बघ–(एब येतो.)

**एब :** चहा तयार आहे–चलायचं सर्वांनीं —

**डॉ बॅरिक :** चला—

**स्टव्हॅसन :** कशाला एवढी तसदी घेतलीत ?

**एब :** चहा म्हणजे अगदींच शामळू पेय आहे असं कोणाला वाटत असेल तर दुसऱ्या एखाद्या जहाल पेयाचीहि व्यवस्था करतां येईल. ( स्टव्हॅसन व बॅरिक गेल्यावर क्रिमिन सिगार टाकण्यासाठीं इकडे तिकडे पाहूं लागतो. ) सिगार असला तरी चालेल क्रिमिन—

**क्रिमिन :** चालेल की ? बरंच झालं–( एबकडे पाहून हसतो.) मित्रत्वाच्या नात्यानें त्याच्या हातावर हात मारतो आणि जातो. शेवटीं एबहि जातो. प्रकाश कमी कमी होत जातो. )

## दृश्य १० वें

इलिनॉईझ येथील लिंकनचें मुख्य प्रचारकेंद्र. तारीख ६ नोव्हेंबर १८६०. निवडणुकीच्या दिवशींची संध्याकाळ. खोली विस्तीर्ण असून तिला दोन खिडक्या असतात. त्या खिडक्यांतून बाहेरची बाल्कनी दिसत असते. वरच्या उजव्या व डाव्या बाजूंकडे दोन दरवाजे असतात. डाव्या बाजूकडे एका मेजावर वर्तमानपत्रें व कात्रणें पडलेलीं असतात सभोंवतीं पुष्कळशा खुर्च्या व पिकदाण्या असतात. दोन्ही खिडक्यांच्या मध्यें पण मागील बाजूस तेहतीस प्रांताचा मोठा तक्ता टांगलेला असतो. प्रत्येक राज्यांतील मतदारांची संख्या दिलेली असून दोन्ही बाजूंना पत्रकें लावण्यासाठीं मोकळी जागा सोडलेली असते. नकाशाच्या अगदीं वरच्या बाजूला असलेल्या आलाबामा व आर्कान्सास राज्यांच्या जागीं हात पोहोंचण्यासाठी लहानशा शिडीची व्यवस्था केलेली असते. डावीकडे भिंतीवर

अमेरिकेचा ध्वज फडकत असतो. उजवाकडे संघराज्याचा नकाशा असून त्यांतील प्रत्येक राज्यावर लाल, पांढरें किंवा निळें निशाण लावलेलें असतें. एब डाव्या बाजूला वृत्तपत्रांचीं कात्रणें वाचीत असतो. त्याच्या डोक्यावर हॅट असून नाकावर चष्मा असतो. त्याची पत्नी उजवाकडे बसलेली असून ती एकदां एबकडे, मग त्या तक्त्याकडे आणि शेवटी नकाशाकडे अशा आळीपाळीनें पाहत असते. तिच्या डोक्यावर शिरोभूषण, मानेवर व खांद्यावर एक उपवस्त्र आणि हातांत हातमोजे असतात. रॉबर्ट लिंकन तिच्या शेजारीं उभा असून तो नकाशाचा अभ्यास करीत असतो. जॉश स्पीड व निनिअन एडवर्ड्स् मध्यभागी बसलेले असून सिगार्स ओढात आहेत. *अधूनमधून ते तक्त्याकडे पाहत* असतात उजव्या बाजूकडील दरवाजा उघडा असून त्यांतून तारायंत्राचा कड कट्ट असा आवाज ऐकू येत आहे. डावीकडील खिडकी अर्धवट उघडा असून तींतून खालील चौकांत सुरु असलेल्या बँडचे स्वर मंद मंद ऐकू येत असतात. बाल्कनींतून मॅजिक लँटर्नच्या साहाय्यानें दाखविण्यांत असलेले मतदानाचे आंकडे पाहून प्रेक्षक वाजवीत असलेल्या टाळ्याहि मधून मधून ऐकू येतात. टेलिग्राफ ऑपरेटर जेड एकसारखा उजवीकडून आंत येऊन तक्त्यावर पत्रकें लावीत असतो. फिल नांवाचा दुसरा एक मनुष्य बाल्कनींत असून तो जेडकडून पत्रकें घेत असतो.

**रॉबर्ट** : काय हो स्पीड नकाशावर दाखविलेल्या या निरनिराळ्या रंगांच्या निशाणांचा अर्थ काय हा ?

**जॉश** : ( वर न पाहतांच ) तांबडें म्हणजे जें राज्य नक्की आपल्याला अनुकूल आहे-( जेड येतो. ) पांढरें म्हणजे अर्धमुर्ध आणि निळें म्हणजे सर्वस्वीं प्रतिकूल. ( एब वाचीत असलेलें कात्रण टाकून देऊन दुसरें घेतो व तें वाचूं लागतो. जेड येतो व इलिनॉईझ, मेरीलँड व न्यूयॉर्क यांच्यासमोर पत्रक टांचण्यासाठीं वर जातो. )

**निनिअन** : ( बघण्यासाठीं उठून ) इलिनॉईझमध्यें लिंकन आणि डग्लस अगदीं सारखे आहेत—

**जॉश :** मेरीलँडमधलीं सगळीं मतं ब्रेकेनरिज आणि बेल पटकवणार. एब, मेरीलँडमध्यें तुला आशाच करायला नको.

**मेरी :** ( अतिशय काळजीनें व आतुरतेनें ) आणि न्यूयार्कमध्यें ?

**जेड :** ए फिल, तुझ्याजवळ पत्रकं नसतील तेव्हां खिडकी बंद करून टाकीत जा ती. बाहेरच्या कटकटीमुळें आपल्या मनांतले विचार सुद्धां आपल्याला ऐकूं येत नाहींत.

**फिल :** ठीक आहे--मात्र मला एकसारखी उघडमोट करावी लागेल तिची– ( खिडकी बंद करतो. )

**मेरी :** न्यूयॉर्कमधील रागरंग कसा काय आहे ?

**निनिअन :** डग्लस एक लाख–सतरा हजार-लिंकन एक लाख सहा हजार-

**मेरी :** ( एबला वैतागानें ) न्यूयॉर्कमध्यें त्याला मतं जास्त पडताहेत, एब-

**जॉश :** असं काय? अजून काय झालं आहे? आत्तां आलेलीं हीं मतं शहर विभागांतलीं आहेत. त्या विभागांत डग्लसला मतं मिळणारच.

**एब :** ( कात्रणें वाचण्यांत गढून गेल्यासारखा ) वाः ! या न्यूयॉर्क हेरल्डनें काय लिहिलं आहे पाहा माझ्याबद्दल. ' स्वरूप वानराचं आणि हृदय कृष्णसर्पाचं '. वा– तें कात्रण टाकून दुसरं वाचूं लागतो. )

**निनिअन :** ( मेजाच्या डाव्या बाजूला बसून ) बॉब, इलिनॉईझवरचं तें तांबडं निशाण काढून त्या ठिकाणीं पांढरं लाव पाहूं—कारण मला तर आतां शंका वाटूं लागली आहे. ( आपल्याला कांहीं तरी करायला मिळालं अशा आनंदानें रॉबर्ट निशाण बदलतो. नंतर तो जॉशच्या डाव्या बाजूला येतो. )

**मेरी :** निनिअन, पेन्सिलव्हेनियांत कसं काय आहे लक्षण ?

**निनिअन :** तिथली कांहीं काळजी नाहीं मेरी. तिथं एब नंबर मारणारच. खरं म्हणजे तिथला विचारसुद्धां करायला नको.

**मेरी :** बरोबर आहे. असंच म्हणताहांत तुम्ही एकसारखं ! त्याची कांहीं काळजीच नको—त्याचा विचारसुद्धां करायला नको —! पण प्रत्येक केंद्रांत डग्लसला जास्त मतं मिळताहेत हें प्रत्यक्ष दिसत असतांना काळजी नाहीं तर दुसरं काय करायचं माणसानं ?

**जॉश :** पण बहुतेक ठिकाणीं निदान आतांपर्यंत एबचाच जोर वाढतो आहे.

**निनिअन :** न्यूयॉर्कमधलीं सगळीं मतं मोजून तर होऊं देत–मग व्हाईट हाऊसमध्यें चालूं लागण्याचा तुझा मार्ग मोकळा झालेला आहे कीं नाहीं तें समजेल तुला.

**मेरी :** मेले मतमोजणी पटापट कां नाहीं करीत ?

**एब :** ( व्यग्र असल्यासारखा ) करतील–करतील—

**बिली :** ( उजव्या बाजूनें प्रवेश करतो. बराच प्यालेला दिसतो, पण त्याचा आपल्या शरीरावर वगैरे चांगला ताबा असतो. तो मधल्या खुर्चीच्या उजव्या बाजूला जातो. ) खालीं गोळा झालेल्या गर्दींतले लोक बघून तर माझं डोकं गरगरूं लागतं. भिंतीवर कोणतंहि पत्रक लागलं कीं, बिचारे टाळ्या वाजवीत सुटतात–मग कोणालाहि का अधिक मतं मिळालेलीं असत ना ? तसंच, बिचाऱ्यांना कोणाहि उमेदवाराचं चित्र पाहायला मिळालं तरी ते देतात. मग तें चित्र जॉर्ज वॉशिंग्टनचं का असेना ? इतका खुळचट आहे त्यांचा उत्साह.

**जॉश :** मग ? बरोबर आहे. या उमेदवारांत काळे गोरे निवडणं कठीणच आहे.

**बिली :** ( एबला ) खालीं कितीतरी वृत्तपत्रकार आले आहेत. तुम्ही निवडून आलांत तर जाहीर रीतीनं तुम्ही प्रथम काय कराल हें समजायला हवं आहे त्यांना—

**निनिअन :** काय सांगूं त्यांना, एब ?

**एब :** ( वाचतां वाचतां ) त्यांना सांगा कीं; अध्यक्ष झाल्यास मीं माझी दाढी वाढवायचं नक्की ठरवलं आहे.

**जॉश :** दाढी ?

**निनिअन :** हें कसलं भलतंच वेड शिरलं तुमच्या डोक्यांत ?

**एब :** ( एक नवें कात्रण उचलून ) परवां एका मुलीचं मला पत्र आलं होतं. मी जरा अधिक रुबाबदार दिसण्यासाठीं यापुढें कल्ले राखावे असं सुचवलं होतं तिनं आणि मी निवडून आलों तर तसंच करणं मला भाग पडेल. ( जेड डावीकडून येतो. त्याच्या हातांत कनेक्टिकट आणि मिसुरी येथून आलेलीं पत्रकं असतात. तीं तो सगळीं मध्यावर ठेवतो. )

**मेरी :** यांत कसं काय आहे ? न्यूयॉर्कच्या मतमोजणीची कांही नवीन बातमी आहे का ?

**निनिअन :** ( नकाशा व फलक पाहण्यासाठीं गेलेला असतो. ) कनॅक्टिकटला एबचा खूपच जोर आहे. म्हणजे आतां अकरा केंद्रांत तर तो आघाडीवर आहे म्हणायचा ? ( जेड खिडकीशीं जाऊन ती ठोठावतो. फिल खिडकी उघडतो. खालून जयजयकार ऐकू येतो. ) मिसुरी-डग्लस पस्तीस हजार, बेल तेहतीस, ब्रेकेनरिज सोळा, लिंकन आठ—

**मेरी :** मग हे लोक टाळ्या कसल्या वाजवताहेत ?

**बिली :** तें त्यांना तरी कुठं माहीत आहे ? मेरी खिडकी लावून घेते. खालून येणारा आवाज विरून जातो. )

**एब :** ( आणखी एक कात्रण घेऊन ) शिकॅगो टाईम्सनं म्हटलं आहे, 'लिंकन खलास झाला. त्याची हृदयक्रिया थंडावली—पाय मोडले—जीभ टाळ्याला जाऊन चिकटली—त्याची सगळी क्रियाशक्तीच नष्ट झाली. लोकांचा त्याला बिलकूल पाठिंबा नाहीं—तो आतां त्यांच्या उपहासाचा विषय झाला आहे—लोकांनीं डग्लसला आपला पुढारी मानलं आहे—तोच निवडून येणार हें नक्की झालं आहे—' ( कात्रण फेकून देतो. )

**मेरी :** ( तिच्या आवाजांत कंप निर्माण झाला आहे. थोडी उजव्या बाजूला जाऊनं ) सहन होत नाहीं आतां हें मला—

**एब :** ( घाईनें उठून ) साहजिकच आहे. पण मला वाटतं कीं, तूं आतां घरीं जावंस हें बरं. मी येतोंच थोड्या वेळानं—

**मेरी :** ( बेभान होऊन ) घरीं कां म्हणून जाईन मी ? माझी अडचण वाटते आहे तुम्हांला ! लग्न झाल्या दिवसापासून वाटते आहे आणि त्यापूर्वींहि वाटत होती. मी तुम्हांला दृष्टीसमोर सुद्धां नकोशी झालें आहे-माझा तिरस्कार वाटतो तुम्हांला ! तुम्हां सगळ्यांनाच-तुमच्या मित्रांना सुद्धां तिरस्कार वाटत असतो माझा—मी तुमच्या जीवनांत आलें नसतें तर बरं झालं असतं असचं वाटतं तुम्हांला—

**जॉश :** असं नाहीं मेरी-( तिचा तो अवतार पाहून एब झटकन् उभा राहिलेला असतो. त्याची स्वतःची मनःस्थितिहि तंग झालेली असते.

मेरीचं म्हणणं शांतपणें ऐकून घेण्यासारखी मनःस्थिति नसते त्याची. निनिअन वगैरेकडे तो कांहींसा तीव्रतेनें पाहातो. )

**एब :** आपण सर्वजण जरा बाहेर जातां का ?

**निनिअन :** अवश्य, एब—( तो व इतर सर्वजण तारऑफिसच्या कोठडींत जातात. जॉश जातां जातां रॉबर्टला चलण्याविषयीं खुणावतो. रॉबर्ट मेरीकडे रोखून पाहात बाहेर जातो. एब विलक्षण बेफामपणें मेरीच्या अंगावर धांवून जातो. )

**एब :** धिक्कार-धिक्कार असो तुला ! लोकांनीं मला आणि तुलासुद्धां मूर्खांत काढावं अशी वागत असतेस तूं नेहमीं ! आपल्या घरांत-आपल्या खाजगी जीवनांत तूं अशी वागतेस हेंहि वाईटच—पण इथं—इतक्या लोकांसमोरसुद्धां तशीच वागतेस तूं ? याद राख पुन्हा अशी वागलीस तर, ऐकायला येतंय् का ? तुला पुन्हां अशी वागलीस तर याद राख. ( त्याचा तो रुद्रावतावर पाहून मेरी इतकी गर्भगळित होते कीं, तिचं मघाचं सगळं अवसान एकदम खचतं आणि फक्त भीतीचीच भावना तिच्या ठिकाणीं शिल्लक राहते. )

**मेरी :** ( दबलेल्या पिचलेल्या स्वरांत ) एब-शिव्या दिल्यात मला. तुम्ही काय केलंत याचं भान आहे का तुम्हांला ? तुम्ही मला शिव्या दिल्यात— ( एब रागानें पुन्हा बोलूं पाहतो-पण मोठ्या कष्टानें तो आपलं मन आवरतो )

**एब :** ( वरमून ) मला भानच राहिलं नाहीं मेरी. आतां पश्चात्तप होतो आहे मला. पण मला अजूनहि असं वाटतं कीं, इथं थांबून आपल्या डोक्याला असा त्रास करून घेण्यापेक्षां तूं घरीं जावंस हें बरं. इथं थांबणं म्हणजे 'आपुलें मरण पाहिलें म्या डोळां—' अशासारखंच आहे. ( मधल्या मजाच्या मागें जाऊन उभा राहतो. )

**मेरी :** ( त्याच्याकडे निर्विकारपणें पाहात असते. कांहीं वेळानें ) मी लहान होतें तेव्हा, तसंच तरुणपणीं स्प्रिंगफील्डमधले अनेक रंगेल तरुण माझं प्रणयाराधन करीत असतांना, आणि लोकांच्या अपेक्षेविरुद्ध आपल्यावर मी प्रेम करूं लागलें तेव्हाहि, आजच्या रात्रीच्या प्रसंगाचंच स्वप्न मला पडत असे. माझे पति संघराज्याचे अध्यक्ष झाले हें वर्तमान माझ्या कानावर घालणारी ही आजची रात्र ! आतां माझे पति जरी खरोखरच

संघराज्याचे अध्यक्ष झाले तरी त्याचा सगळा आनंद आतां नाहींसा झाला. फार उशीरा ही रात्र उगवली. ( एब वळून तिच्याकडे पाहतो. मेरी उजव्या बाजूचा दरवाजा उघडून बाहेर जाते. एब तिच्याकडे काळजीनें व उद्वेगानें पाहात राहतो. नंतर तो चटकन् डाव्या बाजूच्या दरवाजाकडे जातो. )

**एब** : बॉब-(दारांतून मागें होतो. रॉबर्ट प्रवेश करतो. ) घरीं जा आपल्या आईबरोबर.

**रॉबर्ट** : जायलाच पाहिजे मला ?

**एब** : होय-ताबडतोब जा आणि मी घरीं येईपर्यंत तिच्याजवळच अस. ( रॉबर्ट उजव्या बाजूच्या दरवाजानें जातो. एब उजवी बाजू व मध्यभाग यांच्यामधील खिडकीकडे जातो. )

**फिल** : ( खिडकीशीं येऊन ) लिंकन, निवडून येण्याची आशा वाटते तुम्हांला ?

**एब** : निवडून आलों काय किंवा न आलों काय—मला दोहोंचीहि किंमत सारखीच आहे. ( खिडकी उघडल्यामुळें गर्दींतील कांहीं आवाज ऐकूं येतात. कांहींजण एबच्या गौरवपर गाणें म्हणत असतात. गाणें चालूं असतांना फिल खिडकीशीं उभा राहातो. गाणें संपल्यावर गर्दींतील लोक जयजयकार करतात. फिल खिडकी बंद करतो. जेड पत्रक लावायला आलेला असतो. एब खिडकींतून मागें वळतो. जेड डावीकडून निघून जातो.)

**निनिअन** : ( उजवी बाजू व मध्य यांच्यामध्यें उभा राहून ) चौऱ्याहत्तर केंद्रांतून तुम्हांला सर्वांत अधिक मतं मिळालेलीं आहेत. आणखी सत्तावीस केंद्रांतहि असंच होईलसं वाटतं. न्यूयॉर्कमधल्या मतांच्या जोरावर तुम्ही नक्की निवडून येणार. (बिली फलकाजवळ गेलेला असतो. )

**जॉश** : (एबकडे पहात पहात डाव्या बाजूकडून खालीं येतो.) एब, थोडी कॉफी आणवूं कां तुझ्याकरितां ?

**एब** : छे—छे—कशाला जॉश?

**निनिअन** : मन खचलं आहे तुमचं, एब ?

**एब :** छे–छे–माझं मन खचायला काय झालंय? या निवडणुकींत मी पडलों तर माझ्या पत्नीच्या मनाला केवढा जबरदस्त धक्का बसेल याचा विचार करतों आहें मी.

**निनिअन :** आणि माझ्या मनाला? दहा हजार डॉलर्सची पैज लावून बसलों आहें मी —

**बिली :** ( तिरस्कारानें ) मला वाटतं यांच्या अपयशामुळें होणाऱ्या तुमच्या नुकसानीपेक्षां देशाचं नुकसान खात्रीनं अधिक होईल.

**जॉश :** एब, तुला स्वतःला काय वाटेल?

**एब :** माझ्या आयुष्यांत कधीं टाकला नव्हता असा सुटकेचा निःश्वास टाकीन मी—( जेड पत्रकं घेऊन येतो. )

**जेड :** नवीन बातमी आली आहे —( देऊन जातो. )

**निनिअन :** ( वाचीत ) 'रात्रीं नऊ वाजल्यानंतर थोड्या वेळानें ऑगस्ट बेलमॉटनें असं जाहीर केलं कीं, न्यूयॉर्कमध्यें स्टीफन ए. डग्लस यांना त्यांच्याच खालच्या उमेदवारापेक्षां पन्नास हजार मतं अधिक मिळाल्यामुळें ते आतां निवडून आल्यासारखेच आहेत.'

**बिली :** बेलमॉट गेला झक मारीत–( क्रिमिन प्रवेश करतो. त्याच्या हातांत सिगार असून मुद्रेवर प्रसन्नता दिसत असते. )

**क्रिमन :** सद्गृहस्थहो, आतां कसं काय वाटतं आहे?

**निनिअन :** हें वाचून पहा क्रिमन–( मघांचें पत्र त्यास देतो )

**क्रिमिन :** ( तें वाचून हंसत हंसत ) ऑगस्ट बेलमॉट? त्याची अखेरची धडपड चालली आहे ही. मी शिकॅगोला गेलों होतो–तिथं आपला चांगलाच जोर आहे. खरं सांगायचं.म्हणजे लिंकन, तुमच्याकडे वशिला लावायला धडपडणाऱ्या लोकांपासून तुमचं संरक्षण करण्यासाठीं मी आत्तां मुद्दाम आलों आहें. ( जेड आणखी कांहीं पत्रकें घेऊन येतो. ) हे वशिलेवाले लोक आतांपासूनच जिन्यांत रांग लावून उभे आहेत. ब्रिटिश खात्याचे चार मंत्री आणि अकरा सेक्रेटरीज ऑफ स्टेट मीं माझ्या डोळ्यांनींच पाहिले–( जेड खिडकीशीं जातो. )

**बिली :** ( तक्ता पाहून ) न्यूयॉर्क! डग्लस एक लाख त्र्यायशीं हजार-लिंकन एक लाख ऐशीं हजार—( फिल खिडकी उघडतो. )

**जॉश :** पाहिलंस एब ! तुझा आंकडा चालला फुगत. ( खिडकी लागते. )

**क्रिमिन :** न्यूयॉर्कमधूनच पुढचं पत्रक आलं कीं, त्यांत तुम्ही अगदीं नक्की जिंकलेलं असणार. माझं आत्तांचं हें भविष्य लक्षांत ठेवा लिंकन. निवडणुकींतच्या तुमच्या यशाचं बोचकं बांधून तयार आहे—नुसती तुमच्याकडून पावती घ्यायची बाकी आहे. आपण शर्थीनं लढलों आणि त्याच्या परिणामीं जिंकलोंहि !

**एब :** होय, बरोबर आहे. आपण शर्थ केली—अनाचारानं सडून गेलेल्या राजकारणाच्या इतिहासातील घाणेरड्या प्रचाराच्या लढाईत आपण मोठ्या शर्थीनें लढलों खरे ! जर मी खरोखरच यशस्वी झालों तर मला हंसतमुखानं माझं राजकीय देणं फेडून टाकावंच लागेल. ज्यांनीं ज्यांनीं म्हणून माझ्या उमेदवारीला आणि नंतर निवडणुकींत मला साहाय्य केलं त्याचं ऋण फेडावंच लागेल मला. माझ्या यशापयशावर पैजा लागलेल्या आहेत-शंभरदा लोक मला विकत घेत आहेत आणि विकित आहेत. माझ्या नांवानें जितकीं म्हणून खोटींनाटीं आश्वासनं देण्यांत आलीं असतील तीं सगळीं मला पुरीं करावींच लागणार.

**निनिअन :** तें सगळं आम्हांला माहीत आहे एब-पण या निवडणुकींत तुम्ही यशस्वी झालां आहांत ही वस्तुस्थिति कायमच राहाते. ऱ्होड बेटांत अनेक पक्षांनीं हातमिळवणी करून आपला उमेदवार उभा केला होता-त्यालाहि चीत केलंत तुम्ही.

**एब :** जरा जाऊन येतों हं मां—( डाव्या बाजूनें बाहेर जातो. )

**निनिअन :** ( उत्साहानें ) बिचारा एब—

**क्रिमिन :** तुम्ही सर्वजण लिंकनचे अनेक वर्षांचे आणि अतिशय निकटचे मित्र आहात मला जो प्रश्न सारखा भंडावतो आहे त्याचं उत्तर तुम्हांला देतां येईल कदाचित्. आपण निवडून न आलों तर बरं असं लिंकनला वाटत असावं अशी कल्पना आहे माझी. शक्य असेल का हें ?

**जॉश :** ही तुमची कल्पना अगदीं शंभर टक्के बरोबर आहे.

**क्रिमिन :** ( डाव्या बाजूकडे पहात ) मला स्वतःला मात्र हा अगदीं नवीन आणि गंमतीदार अनुभव आहे.

**बिली** : ( चवताळून क्रिमिनजवळ जाऊन ) आजच्या या मामल्यांत संघराज्याचा अध्यक्ष होणं तुम्हांला तरी परवडण्यासारखं आहे का ? तुम्ही अलीकडचीं वर्तमानपत्रं वाचीत नाहीं वाटतं ?

**क्रिमिन** : तीं का ? रोजचा रोज काय घडत असतं इकडे पूर्ण लक्ष असतं माझं—( मध्यभागांतील मेजाच्या उजव्या बाजूला बसतो. )

**बिली** : दक्षिण कॅरोलिनामध्यें दहा हजार स्वयंसेवकांची पलटण उभारण्यांत आली असल्याचं माहीत नाहीं तुम्हांला ? त्यांना शस्त्रास्त्रंहि पुरविण्यांत येत आहेत. तिथल्या गव्हर्नरानं तर असं फर्मान काढलं आहे कीं, या निवडणुकींत लिंकन निवडून आला तर तें राज्य संघराज्यांतून फुटून बाहेर पडेल आणि मॅसन-डिक्सन रेषेच्या दक्षिणेकडील सर्व राज्येंहि या बाबतींत त्याच्याशीं हातमिळवणी करतील. याचा अर्थ काय तो समजतो का तुम्हांला ? याचा अर्थ एकच आणि तो म्हणजे युद्ध—यादवी युद्ध, आणि त्याची सगळी जबाबदारी ज्यानं उभ्या आयुष्यात शांतता आणि एकान्त यांच्याशिवाय कशाचीहि इच्छा धरलेली नाहीं त्या लिंकनवर पडणार.

**निनिअन** : जरा शांत हो बिली. आणखी थोडीशी घे जा पाहिजे तर—

**जेड** : ( पुडकें आणून निनिअनच्या हातांत देतो. ) घ्या हें एडवर्ड्स्‌- ( मग खिडकीशीं जाऊन फिलचें लक्ष वेधतो. फिल खिडकी उघडतो आणि जेड बाजूला येत असताना त्याच्या हातांत कर्णा देतो. )

**निनिअन** : ( पत्रक वाचतो. ) ‘ आज रात्रीं साडेदहा वाजतां न्यूयॉर्क हेरल्डनं अशी कबुली दिली कीं, या निवडणुकींत मि. लिंकन यांना कोणाहि उमेदवारापेक्षां कमींत कमी पंचवीस हजार मतें अधिक मिळालीं असून ते यशस्वी झाले आहेत. ’ लिंकन यशस्वी झाले—लिंकन निवडून आले——( पत्रक हवेंत भिरकावतो. )

**जेड** : ( खिडकीच्या बाहेर—निकाल ऐकण्यासाठीं आतुर झालेल्या व अगदीं शांत राहिलेल्या गर्दीला उद्देशून कर्ण्यांतून ) लिंकन निवडून आले—आपले सर्वांचे पुढारी लिंकन निवडून आले—( खालीं टाळ्यांचा प्रचण्ड गजर होतो—बँड वाजूं लागतो. स्टेजवरील सर्व माणसें एकजवळ येऊन त्याचें

८...

हर्षातिशयानें अभिनंदन करतात. कोणी हस्तांदोलन करतात, कोणी त्याला आलिंगन देतात. कोणी त्याची पाठ थोपटतात. )

**बिली :** दैवानं खैर केली-खरोखरच खैर केली-( एबशीं हस्तांदोलन करतो. )

**क्रिमिन :** काय भविष्य सांगितलं होतं मी ? निकालाबद्दल कांहीं शंकाच नव्हती मला—

**निनिअन :** न्यूयॉर्कला कांखेंत मारलंस तूं एब ! जिंकलीस तूं !

**बिली :** न्यूयॉर्क हेरल्डनंच मान्य केलं आहे हें.

**निनिअन :** मी तुमचं मनःपूर्वक अभिनंदन करतों एब.

**बिली :** लिंकन, तुम्ही आतां अध्यक्ष झालात-संघराज्याचे अध्यक्ष झालांत तुम्ही लिंकन.

**क्रिमिन :** मी आपलं अभिनंदन करतों अध्यक्षमहाराज. हा आपला सर्वांचाच महान् विजय आहे.

**जेड :** ( टाळ्यांचा गजर चालू असतांना खिडकी लावून घेतो. कर्णा बाजूला ठेवून खालीं एबजवळ येतो. ) मीहि आपलं अभिनंदन करतों. अध्यक्ष महाशय-( एबशीं हस्तांदोलन करून डाव्या बाजूनें बाहेर जातो. )

**एब :** ( गंभीरपणें ) आभारी आहें-सर्वांचाच आभारी आहें मी--( डाव्या-बाजूकडे जातो. जॉश त्याच्याशीं हस्तांदोलन करण्यासाठीं त्याच्याजवळ जातो. )

**जॉश :** एब, अभिनंदन करतों मी तुझं.

**एब :** मी तुझा आभारी आहे, जॉश.

**निनिअन :** गर्दींतले लोक पाहा काय जयजयकार करताहेत—

**क्रिमिन :** ते आपला जयजयकार करून राहिले आहेत लिंकन—

**निनिअन :** ( मेजावर उभा राहून ) इकडे या ना एब-तिकडून बाहेर जा थोडे-लोकांना दर्शन घडूं द्या तुमचं—

**एब :** नाहीं---तिकडून बाहेर पडण्याची इच्छा नाहीं माझी—( नकारात्मक मान हालवितो. बिली खिडकी लावून घेतो. खालचे आवाज ऐकूं येत नाहींसे होतात. ) मेरीला कळवायला घरीं गेलं पाहिजे मला—( उजवी-कडील दाराशीं जाऊं लागतो. इतक्यांत कॅव्हेनॉ प्रवेश करतो. त्याच्या-

बरोबर दोन माणसं असतात. तीं दरवाजाच्या दोहों बाजूंस उभीं राहतात. आतां खालचा आवाज अजिबात बंद झालेला असतो )

**क्रिमिन** : ( त्याच्याजवळ जाऊन ) हे कॅप्टन कॅव्हेनॉ—लिंकन्.

**कॅव्हेनॉ** : ( सलाम करून ) आपण निवडून आल्यास आपल्याबरोबर राहण्यासंबंधानं हुकूम झालेला आहे मला —

**एब** : त्याबद्दल आभारी आहें मी. पण मला तुमची आवश्यकता नाहीं.

**कॅव्हेनॉ** : आपल्याबरोबर आम्हांला राहायलाच पाहिजे मि. लिंकन. मला आपणाला घाबरविण्याची इच्छा नाहीं, पण आपणाला काय काय धमक्या देण्यांत आलेल्या आहेत तें माझ्याप्रमाणें आपल्यालाहि माहीत असणारच.

**एब** : ( कंटाळून ) बरं आहे जॉश. निनिअन, क्रिमिन, बिली, आपणा सर्वांच्या सदिच्छेबद्दल आभार आहेत— उजव्या दरवाजाकडे निघतो— कॅव्हेनॉ त्याच्यापुढें जातो. )

**कॅव्हेनॉ** : आपल्या परवानगीनें मी पुढें होतों महाराज—( लष्करी पद्धतीनें पुढें होतो. त्याच्या मागून एब जातो. त्याच्या मागून तीं दोन माणसें जातात. प्रकाश कमी होत जातो. )

# दृश्य १२ वें

सिंप्रगफील्डमधील रेल्वे स्टेशनचा प्लॅटफॉर्म. ता. ११ फेब्रुवारी १८६१ ला उजव्या बाजूला आगगाडीचा एक डबा प्रेक्षकांकडे पाठ असलेला दिसतो. त्या दिब्याच्या मागील बाजूला प्लॅटफॉर्म दिसत असतो प्लॅट-फॉर्मवर तोरणें व निशाणें लावलेलीं असतात.

प्लॅटफॉर्मच्या दोन्ही बाजूंना सैनिक उभे असून त्यांच्या हातांत बंदुका व त्या बंदुकांना संगिनी लावलेल्या असतात. ते रांगेंत उभे असून त्यांच्या पाठीवर पिशव्या लटकलेल्या दिसतात. डावीकडे अफाट गर्दी जमलेली असते. त्या गर्दींतले आवाज ऐकूं येत असतात. अगदीं पुढच्या बाजूला कॅप्टन कॅव्हेनॉ असतो. एक लष्करी कॅप्टन प्रवेश करतो.

**कॅप्टन** : या उतारावर सर्वांनीं रांगेंत उभे राहा—( ब्रेकमन हातांत कंदील घेऊन डब्याचीं चाकें तपाशीत असतो. कॅव्हेनॉ तोंडांत विझलेला सिगार धरून खालींवर येरझारा घालीत असतो. तो आपल्या मनगटावरील घड्याळ

पाहतो. कॅव्हेनॉला कांहींशा तिरस्कारानें ) तुम्ही खचलेले दिसतां कॅप्टन कॅव्हेनॉ.

**कॅव्हेनॉ :** खरोखरच मन खचून गेलं आहे माझं. गेले तीन महिने सतत मी यांचा शरीररक्षक म्हणून काम करतों आहें, पण आपल्या स्वतःच्या सुरक्षिततेबद्दल यत्किंचित्हि काळजी त्यांना वाटत नाहीं. मार्च महिन्याच्या चार तारखेला यांचा शपथविधि व्हायचा आहे, पण तोपर्यंत हें जगणंच शक्य नाहींत अशा पैजासुद्धां लागल्या आहेत.

**कॅप्टन :** त्या पैजेंतले थोडेसे पैसे मला मिळाले तर बरं होईल. आमच्या सर्वोच्च सेनापतीच्या जीविताचं संरक्षण करायला आमचं लष्कर पूर्ण समर्थ आहे.

**कॅव्हेनॉ :** संघराज्याचं लष्कर हें करण्याइतकं लायक आहे. अशी आशा आहे मला. पण ते दक्षिणेकडचे लोक बंदूक मारण्यांत मोठे निष्णात आहेत आणि मी तुम्हांला इतकंच सुचवून ठेवतों कीं, तुमच्या सैनिकांनीं गाडीच्या प्रत्येक डब्याच्या प्रत्येक खिडकीवर मोठ्या दक्षतेनें पहारा केलेला बरा–विशेषतः ज्या ज्या वेळीं गाडी एखाद्या स्टेशनांत किंवा दुसऱ्या कुठें थांबेल तेव्हां. आणि जर कुठेंहि धोक्याच्या इशारा ऐकूं आला—

**कॅप्टन :** ( जरासा चिडून ) अकस्मात् संकट उद्भवलं तर काय करावं हें माझ्या माणसांना पुरेपूर समजतं.

**कॅव्हेनॉ :** त्यांना कमीपणा आणण्याचा विचार माझ्या मनालाहि शिवलेला नाहीं कॅप्टन–पण कसल्याहि प्रसंगाला तोंड द्यायला आपण आधींपासूनच तयार असलेलं बरं. ( बँड वाजूं लागतो. गर्दींतील लोक बँडची साथ करतात. गाडीचा कंडक्टर बाहेर येऊन आपल्या घड्याळांत पाहतो. डाव्या बाजूनें निनिअन, एलिझाबेथ एडवर्ड्स्, जॉश, बिली व क्रिमिन येतात. सैनिक त्यांना अडवितात तेव्हां जरा गोंधळ उडतो. कॅप्टन ऐटींत पुढें होतो )

**कॅप्टन :** ( उतारावरून डाव्या बाजूला जात ) मागें हटा–गर्दी मागें रेटा–

**निनिअन :** मी लिंकनचा मेहुणा—

**कॅप्टन :** नांव काय तुमचं ?

**कॅव्हेनॉ :** यांना ओळखतों मी कॅप्टन. हे मिस्टर एडवर्ड्स् आणि या त्यांच्या पत्नी. हे मिस्टर स्पीड, हे हर्न्डन–या सर्वांना ओळखतों मी.

येऊं द्या त्यांना--

**कॅप्टन :** ठीक आहे. येऊं शकतां आपण-( ते सर्व उजव्या बाजूला येतात. कॅप्टन डावीकडे जातो. कॅव्हेनॉ आपल्या हॅटला हात लावून त्यांचा मान करतो.)

**क्रिमिन :** अध्यक्षमहाराजांचं कसं आहे आज ? ठीक आहे ?

**निनिअन :** नेहमीसारखेच्च उद्विग्न दिसताहेत ते !

**बिली :** ( भावनांचा अतिरेक होऊन ) ते ऑफिसांत आले तेव्हां ' लिंकन अँड हर्न्डन ' या आपल्या पाटीचं आतां काय करायचं म्हणून मीं त्यांना विचारलं. तेव्हां ते म्हणाले, ' ती पाटी असूं दे तशीच. या निवडणुकीमुळें या ऑफिसावर कांहींहि परिणाम झालेला नाहीं हें समजूं दे आपल्या अशिलांना. मी जगलोंवांचलों तर केव्हां तरी परत येईन इथं आणि मध्यंतरीं जणूं काय कांहींच घडलं नाहीं अशा तऱ्हेनं आपण पुन्हां वकिली सुरू करूं . '

**एलिझाबेथ :** ' जगलोंवांचलों तर- ' असंच नेहमीं म्हणत असतात ते. ( मोठमोठ्यानें टाळ्यांचा आवाज ऐकूं येतो डावीकडून कॅप्टन येतो. )

**निनिअन :** एब आला वाटतं--

**कॅप्टन :** ( कॅव्हेनॉला ) अध्यक्षमहाराज आले ! ( सैनिकांस ) अटेन्शन ! राईट शोल्डर-आर्म्स ! ( कॅप्टन प्लॅटफॉर्मवरून चालत जाऊन डब्याशीं जाऊन थांबतो. डावीकडे पाहत असतो. )

**कॅव्हेनॉ :** ( निनिअन वगैरेंना ) जरा मागें सरकून उभे राहतां का आपण ? अध्यक्षमहाराज व त्यांच्याबरोबरच्या मंडळीसाठीं थोडी मोकळी जागा असलेली बरी ( ते थोडे सरकतात. टाळ्यांचा आवाज अधिक वाढतो. )

**कॅप्टन :** प्रझेंट-आर्म्स ! ( कॅप्टन सलाम करतो. ओगल्बी व डॉनर अगोदर येऊन दोन्ही बाजूला लक्षपूर्वक पाहतात. नंतर एब डावीकडून येतो. दुसऱ्या दिवशीं त्याला बावन्नावें वर्ष लागणार आहे. त्यानें दाढी राखली आहे. त्याच्या खांद्यावर लोंकरीची शाल असून उजव्या हातांत बॅग आहे. त्याचा डावा हात धरून टॅड चालला आहे. त्याच्या मागोमाग मेरी, रॉबर्ट, विली व मोलकरीण येत असतात. मेरीशिवाय इतर सर्वांच्या हातांत बॅगा असतात. मेरीच्या हातांत फुलांचा गुच्छ असतो.

र्ती सर्व डब्यांत बसतात. एब निनिअन वगैरेंशीं बोलण्यासाठीं जातो. डाव्या बाजूला गर्दीची गडबड सुरू असून तिचा पुढें पुढें सरकायचा प्रयत्न चाललेला आहे. कॅप्टन पुढें घुसतो. )

**कॅप्टन** : मागें हटवा-मागें हटवा सगळ्यांना (– सैनिक गर्दींतील लोकां-पुढें रांगेनें उभे राहतात. कॅव्हेनॉ, ओगल्बी व डॉनर एबच्याजवळ उभे असतात. प्रत्येकाचा हात आपापल्या कोटाच्या उजव्या खिशांत असून ते चौफेर सूक्ष्म निरीक्षण करीत असतात. )

**कॅव्हेनॉ** : ( डब्याच्या·पायरच्यिा वरच्या बाजूनें ) आपण डब्यांत बसावं लिंकनसाहेब. ( तो डब्यांत चढत असतांना गर्दींतील लोकांना दिसतो व ते टाळ्यांचा गजर करतात. ‘ बोला-बोला दोन मिनिटं तरी बोला-’ अशा गर्जना उठतात. एब त्या लोकांकडे पाहून आपली हॅट काढतो व त्यांस अभिवादन करतो. )

**निनिअन** : बोल ना थोडं कांहीं एब-( डाव्या बाजूला पाहत एब कांहीं वेळ स्तब्ध राहतो. नंतर—)

**एब** : मित्रहो, मला आपला निरोप घ्यायचा आहे. मी आतां वॉशिंग्टनला चाललों आहें–दाढी ठेवून जातों आहें–तुम्हांलाहि आवडली असावी ती ! ( हें ऐकून लोक मोठमोठ्यानें हंसूं लागतात व त्याच्या नांवाचा जयजयकार करतात. त्या उत्साहाच्या भरांत–‘ मागें हटा मागें हटा ’ या सैनिकांच्या हुकुमाकडे दुर्लक्ष करून ते पुढें घुसतात. )

**कॅप्टन** : मागें-मागें हटवा त्यांना––

**एब** : कांहीं जरूर नाहीं कॅप्टन–येऊं दे सर्वांना पुढें. हे सगळे लोक माझे जुने दोस्त आहेत.

**कॅप्टन** : जशी आज्ञा-( सैनिकांस ) येऊं द्या लोकांना-( सैनिक लोकांना वाट करून देतात व स्वतः डब्याच्या टोंकाशीं उभे राहतात. कॅप्टनहि तेथें जाऊन उभा राहतो. लोक पुढें येतात व कांहीं वेळानें स्तब्धता होते. )

**एब** : माझ्या परिस्थितींत नसलेल्या कोणालाहि, या वियोगाचं मला किती दुःख होत आहे याची कल्पना करतां येणं अशक्य आहे. मला आज जो हा दिवस दिसला आहे त्याचं सर्व श्रेय या स्थानाला आणि आपणा सर्वांच्या प्रेमाला आहे. या ठिकाणीं मीं पंचवीस वर्षें काढलीं, इथंच माझे

काळ्याचे पांढरे झाले. माझीं मुलं इथंच जन्माला आलीं आणि एकानं तर इथंच आपला देहहि ठेवला. आज मीहि आपला निरोप घेत आहें. मी पुन्हां केव्हां परत येईन–कीं येणारच नाहीं–हें एक त्या परमेश्वरालाच माहीत ! आपल्या अकरा सार्वभौम प्रांतांनीं संघराज्यांतून बाहेर पडण्याचा आपला निर्णय जाहीर केलेला आहे आणि अशा वेळीं संघराज्याच्या अध्यक्षपदाची जबाबदारी माझ्या शिरावर येऊन पडलेली आहे. रोजच्या रोज यादवी युद्धाच्या धमक्या वाढत्या श्रेणीनें कानांवर येत आहेत. माझ्या शिरावर अत्यंत बिकट अशी जबाबदारी येऊन पडलेली आहे. माझं कर्तव्य बजावण्यास तयार होण्यापूर्वीं, आपलं हें संघराज्य आज इतकीं वर्षे कोणत्या महान् तत्वांच्या जोरावर एकसंध राहू शकलं हें समजून घेण्याचा मीं कसून प्रयत्न केला. मला तरी असं वाटतं कीं, आपला मूळ देश इंग्लंड यापासून या वसाहती फुटून निघाल्यामुळें नव्हे, तर आपल्या स्वातंत्र्याच्या जाहीरनाम्यामागील भावनांच्या सामर्थ्यामुळें आपल्या देशांतील लोकांना स्वातंत्र्य आणि सर्व जगाला आशा मिळाली आहे. आपण आपल्या शृंखला एक ना एक दिवस तोडून फेकून देऊं आणि समाजाशीं बंधुभावानें वागून व नांदून स्वातंत्र्याचा उपभोग घेऊं हें मनुष्यमात्राचं प्राचीन स्वप्न त्यामुळें साकार झालं. आपण लोकशाही निर्माण केली, पण ती जगायला लायक आहे कीं नाहीं असा प्रश्न आज उपस्थित झालेला आहे. कदाचित् आज आपल्या स्वप्नाचा शेवट झाला असून आपण जागे झालों आहोंत हें खरं असेल तर तें स्वप्न पुन्हां कधीं पडतांच कामा नये. आपल्याला जी संधि मिळाली ती इतरांनाहि कधींकाळीं मिळेल असं मला वाटत नाहीं. आपण हें कबूल केलं पाहिजे आणि स्वातंत्र्य व समता या आपल्या ध्येयांचा ऱ्हास होत चालला असून तीं नष्ट होण्याच्या पंथाला लागलेलीं आहेत हें आपण मान्य केलं पाहिजे. एकदां एका पौर्वात्य राजानं आपल्या दरबारांतील पंडितांना असं फर्मावलं कीं, कोणत्याहि काळीं आणि कसल्याहि परिस्थितींत जें सारखंच लागू पडेल असं एखादं वचन मला सांगा. त्यांनीं त्याला त्याप्रमाणें वचन सांगितलं तें असंः ‘ हेहि दिवस निघून जातील ! ’ आणि तरीहि ( एकाएकी शांत पण हुकुमी स्वरांत बोलूं लागतो. ) हें वचन त्रिकालाबाधित सत्य नाहीं

असं आपण सिद्ध करून दाखवूं या. आपल्याभोंवतीं जें सर्वसामान्य जग आहे आणि आपल्या स्वतःमध्यें जें बौद्धिक आणि नैतिक जग सामावलेलं आहे त्याची योग्य ती मशागत करून व्यक्तिगत, सामाजिक आणि राजकीय उन्नति आम्ही घडवून आणूं. या उन्नतीचं पाऊल सतत पुढचें पडेल आणि जगाचं अस्तित्व असेपर्यंत ती नष्ट होणार नाहीं असं सिद्ध करण्याचा आपण चंग बांधूं या. परमेश्वराची प्रार्थना करतांना आपणाला माझं स्मरण होईलच–तो परमेश्वरच आपला तारणहार होवो ! गुडबाय ( निनिअन, एलिझाबेथ, जॉश, बिली, किमिन वगैरेशीं हस्तांदोलन करण्यासाठीं वांकतो. लोक गीत गाऊं लागतात. टाळ्यांचा गजर वाढूं लागतो. कंडक्टर आपल्या घड्याळात पाहून कॅप्टनशीं कांहीतरी बोलतो. कॅप्टन डब्यात चढतो. गर्दीतील लोक लिंकनचा जयजयकार करतात. कॅव्हेनॉ एबशीं कांहींतरी बोलूं पाहतो पण बाकीच्या गडबडीमुळें एबला तें ऐकूं येत नाहीं. तेव्हा तो एबच्या हाताला स्पर्श करतो. एब त्याच्याकडे वळून पाहतो. )

**कॅव्हेनॉ** : गाडी सुटायची वेळ झाली महाराज–आंत व्हावं–( गीत अधिक जोरानें म्हटलेलं ऐकूं येतं. गर्दी डब्याशीं जमा होते. डब्यांत शिरतांना एब सर्वांना नम्रतापूर्वक अभिवादन करतो. सैनिक कसेबसे वर चढून जातात. गीत संपता संपतां प्रकाश कमी कमी होत जाऊन शेवटीं अंधार होतो. पडदा पडतो. )

**समाप्त**